हें पुस्तक **गजानन कृष्ण दाबके** यांनीं आपल्या
लघुलेखन पद्धतीनें लिहून घेतलें.

# प्रकरण १

## मी उद्योगाला लागलें

' इतिहासांत ज्या व्यक्तींचीं नांवं झळकलीं आहेत त्या व्यक्तींनींच इतिहास निर्माण केला आहे. ' हा जो समज आहे तो किती खोटा आहे ! नांवाजलेल्या या ऐतिहासिक व्यक्तींच्या छत्राखालीं जीं माणसं गोळा झालीं, नि ज्या माणसांनीं स्वतःचे देह, मनं नि प्राण खर्ची घालून या ऐतिहासिक व्यक्तींना ऐतिहासिकता दिली, त्या सामान्य समजल्या जाणाऱ्या माणसांचा इतिहास कुणी कधीं लिहिणार आहे का ? काळाच्या पोटांत हीं माणसं गडप होऊन गेलीं आहेत. आज त्यांचा मागमूस सुद्धां लागत नाहीं. पण तीं माणसं इतिहासाच्या हिशेबीं त्यांच्या काळांत महत्त्वाचीं होतीं हें कुणालाच नाकबूल करतां यायचं नाहीं.

माझ्या चारित्राकडे मी पाहिलं म्हणजे मला असं वाटतं, मी इतिहास निर्माण केला नाहीं. इतिहास निर्माण करणारांना माझी मदतही झाली नाहीं. इतिहास निर्माण करणारांना माझ्याकडून प्रेरणाही मिळालेली नाहीं; पण जगाच्या इतिहासांत मला कुठं तरी जागा आहे. या जगांत मी वावरलें आहें. माझ्या बरोबर वावरणाऱ्या व्यक्तींच्या चरित्रावर माझ्या चरित्राचा परिणाम झाला आहे, आणि त्याचप्रमाणें जगाच्या व्यवहारांत देखील थोडी ना थोडी तरी ढवळाढवळ घडून आली आहे आणि म्हणूनच मी माझं हें चरित्र जगापुढं मांडायला तयार झालें आहें.

## वेणू वेलणकर

इतिहासाच्या कसोटीला माझें चरित्र कदाचित् उतरणारं नसेल, संशोधकांच्या दृष्टीनं त्याला एका कवडीची किंमत नसेल; पण माझं चरित्र मला मोठं वाटतं नि म्हणूनच त्याचा हा उतारा करून ठेवणं मला अप्रस्तुत वाटत नाहीं.

अगदीं लहानपणापासूनच्या आठवणी कांहीं साऱ्याच माणसांना असत नाहींत. मी देखील माझं बाळपण ज्यावेळीं आठवूं लागतें त्या वेळीं स्वप्नांतील आठवणीसारख्या एकेक गोष्टी माझ्या नजरेसमोर उभ्या राहातात. स्वप्नांतील गोष्टीही मला आठवतात नि बालपणांतील गोष्टीही मला आठवतात; म्हणून त्यांतील स्वप्नांतल्या कुठल्या नि बाळ-पणांतील कुठल्या यांचं साम्य सांगतां येत नाहीं.

एक प्रसंग आठवतो—तो मात्र स्वप्नांतला खास नव्हे. घरांत मोठी आरडाओरड चालली होती. आई धाय मोकलून रडत होती. शेजा-रच्या बाया येऊन तिला न्हाणीघरांत घेऊन गेल्या. आंघोळ करून ज्या वेळीं ती आली त्यावेळीं मला उराशीं कवटाळून टाहो फोडून रडूं लागली. मीही रडत होतें; पण कां रडत होतें हें माझं मलाच कळत नव्हतं. आई रडते आहे—तिला कांहीं तरी दुःख झालं आहे—एव्हढी मोठी आई रडते म्हणून मला रडूं येत होतं. मी मोठी झालें त्या वेळीं मला कळलं, कीं मी त्या दिवशीं पितृसुखाला आंचवलें होतें.

मला वाटतं, या वेळीं माझं वय तीन चार वर्षांचं असावं. आठव-णींत असलेली ही ठळक गोष्ट घडल्यानंतर मी निरनिराळ्या गावीं फिरत होतें एव्हढंच आतां मला आठवतं. केव्हां प्रवास खटाऱ्यांतून केला होता, केव्हां आगगाडींतून केला होता आणि केव्हां मला कडेवर घेऊन माझी आई पायींही चालली होती.

जुन्या आठवणी पडताळून पाहण्यासाठीं या प्रवासांची हकीकत आईला विचारावी असं किती तरी वेळां माझ्या मनांत येई; पण ती होऊन जोपर्यंत आपल्याला हकीकत सांगत नाहीं तोपर्यंत आपण तरी

तिला कां विचारावं या अभिमानानें मी आजतागायत हा प्रश्न विचार-ण्यासाठीं कधींही तोंड उघडलं नाहीं.

या हकीकती कळून तरी मला काय करायचं होतं ? मी पितृहीन झालें, आईला दारोदार भटकावं लागलं, तिचे बरेचसे हाल झाले, एव्हढया गोष्टींची जाणीव जो पर्यंत स्पष्टपणें होत होती तो पर्यंत तपशी-लाची पर्वा तरी मी कां करावी ?

आईचा स्वभाव मोठा अभिमानी आहे. आज म्हणजे अशी फारशी सुखाची परिस्थिति आहे असं नाहीं, पण सुखदुःखाच्या गोष्टी सांगणं तिला मुळींच आवडत नाहीं. माझे वडील वारल्यानंतर तिच्या आयु-ष्याला जें एक प्रकारचं वळण लागलं त्यामुळें आम्ही एकमेकांना पारख्या झाल्यासारख्या होतों. तिनें जो पेशा पत्करला होता त्या पेशाच्या पायीं दिवसाचे चोवीस तास ती गुंतून रहात असे. माझ्याकडे लक्ष द्यायला तिला पुरेसा वेळही नसे. त्यावेळीं माझा भार मलाच सहन करावा लागत असे. तीच संवय अंगवळणीं पडत गेली आणि मी जन्माची मित्रहीन बनलें स्वतःचा विचार स्वतःच करायचा, सल्ला मस-लत स्वतःचीच घ्यायची, मनाचा निश्चय ठरवायचा तोही स्वतःचा स्वतःच, अशारितीनें मी जन्माची एकलकोंडी बनून राहिलें.

माझे वडील वारले त्यावेळीं आमचं स्वतःचं असं कांहीं सुद्धां नव्हतं. आईच्या माहेरचीं माणसं होतीं. पण तींही आमच्या इतकींच दरिद्री होतीं. माझ्या वडिलांचे कुणीं चुलत भाऊ वगैरे होते असं म्हणतात. अजूनपर्यंत मी त्यांना पाहिलं नाहीं आणि यापुढं पाहाण्याची इच्छाही नाहीं. पण पहिल्यापासूनच माझ्या वडिलांचं नि त्यांचं वितुष्ट असल्यामुळें प्रसंगीं ते मला उपयोगी पडतील अशी आशा करायला जागा नाहीं.

आणि तशी कुणाचीच आशा माझ्या आईनं धरली नव्हती. स्वतः च्या पायावर उभं राहायचं तिनं पत्करलं होतं खरं. पण ती एक स्त्री

होती, अशिक्षित होती आणि विशेषतः असहाय होती. बायकांना, विशेषतः ब्राह्मणांच्या बायकांना स्वतंत्ररितीनें करतां येण्याजोगा जो एक धंदा होता तोच तिनें पत्करला. माझ्या आईनं आमच्याच गांवीं पहिल्यांदा एक खाणावळ घातली. मी तेव्हां लहान होतें. आमच्या घरीं पुष्कळ माणसं जेवतात, या पलिकडे आमचा उदरनिर्वाह कशावर होतो याची मला कल्पना नव्हती.

खाणावळीचा धंदा पत्करल्यामुळं गावांतील बायका माझ्या आईला कमी लेखीत असत; नि तीही मानी असल्यामुळें ओळखीदेखीच्या बायकांशीं देखील तिनं आपला संबंध तोडून टाकला होता.

तालुक्याचं गांव ! तिथं खाणावळीच्या धंद्यांत मिळून मिळून असं काय मिळणार ? कसाबसा आमचा उदरनिर्वाह होत असे एव्हढंच.

आई परिस्थितीशीं झगडत होती—परंतु तिच्या या झगड्याची कल्पना मला नव्हती. शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या मुलींबरोबर खेळायचं—मुलांबरोबर नव्हे—मुलांमुलींनीं एकत्र खेळणं हें त्या तालुक्याच्या गांवीं मंजूर नव्हतं. थोडंसं शाळेंत जायचं—शक्य तितकी शाळा चुकवायची आणि घरांतून जितकं दूर राहातां येईल तितकं दूर राहायचा प्रयत्न करायचा, हीच माझी दिनचर्या होती. आई देखील फारशी माझी चौकशी करीत नसे; म्हणजे माझ्याबद्दल तिला कळकळ नव्हती असं नाहीं, पण तितक्या कळकळीनं चौकशी करण्याइतकी तिला फुरसतच नसे. खाणावळींत जीं दहा बारा माणसं जेवायला होतीं, त्यांच्या जेवणाची व्यवस्था करण्यासाठीं तिला सारा दिवस राबावं लागत असे.

जेवणारे लोक होते त्यांच्याकडून पैसे वेळीं मिळत नसत, त्यामुळं देणेकऱ्यांचे तगादे लागत. ते पैसे आले नाहींत म्हणजे जेवण करीत असतांना चडफडत आई जें आपल्याशींच बोले–केव्हां केव्हां मला उद्देशून बोले—त्यामुळं त्या वेळच्या आमच्या गृहस्थितीची कल्पना मला आतां करतां येते आहे.

मला आठवण आहे, ते कुणीतरी कोर्टोतील कारकून असावेत. नाझर किंवा शिरस्तेदार असेच कुणीतरी होते. ते वारंवार माझं कौतुक करीत असत. मी शाळेंत गेलें कीं नाहीं, अभ्यास केला कीं नाहीं, माझी प्रकृती, माझे कपडेलत्ते, वगैरे गोष्टींबद्दल विचारल्याशिवाय त्यांचा एक दिवस देखील जात नसे. त्यांना माझ्याबद्दल एव्हढी कळकळ वाटे खरी पण त्या त्यांच्या प्रश्नांचा मला राग येत असे. मी शाळेंत जाईन किंवा न जाईन—या गृहस्थाला त्याचं काय होय? प्रत्यक्ष माझी आई, ती कधीं मला विचारीत नाहीं—आणि हे माझ्या घरीं जेवायला येणारे गृहस्थ यांनीं काय म्हणून नसती चौकशी करावी? त्यांच्या प्रश्नांना म्हणूनच मी अगदीं तुटक उत्तरें देत असें.

मी कशींही उत्तरं दिलीं तरी त्यांनीं माझी चौकशी करायचं कधींच बंद केलं नाहीं! मी फारच तुटकपणा दाखवला तर ते मला जवळ ओढून घेत, माझ्या डोक्यावरून हात फिरवीत, 'अशी उत्तरं देऊं नयेत' म्हणून मोठ्या गोड भाषेंत सांगत—पण मी कधींच बधलें नाहीं. चुकूनसुद्धां त्यांना कधीं सरळ उत्तर दिलं नाहीं.

मला चांगलं आठवतं, एके दिवशीं त्यांनीं माझ्या आईला विचारलं, तेव्हां ती म्हणाली, "दळभद्री पोरगी. तिला स्वतःचं काय आहे? खाटतें आहें, राबतें आहें मी. जरा वयानं मोठी असती तर कामाला तरी राबवून घेतली असती. असं वाटतं, नसती पोर तरी बरं झालं असतं संकटंच यायचीं, त्यांत पोरं कशाला गळीं पडून राहतात देव जाणे."

ते गृहस्थ म्हणाले, "असं बोलूं नये सत्यभामाबाई. तुमची वेणू आहे हुशार पण तिला तुम्ही रीत लावीत नाहीं. मुलगी लहान आहे म्हणून काय झालं? लहानसान कामाला देखील नाहीं का हातभार लावायची? पण हीं लहानसान कामं कशीं करायचीं हें तुम्हीं शिकवलं पाहिजे."

त्यांच्या बोलण्याचा माझ्या मनावर परिणाम झाला. सारी रात्र मी बिछान्यावर विचार करीत तळमळत होतें. आई आपणाला वळण

लावीत नाहीं, म्हणजे काय ? आणि लहानसान कोणतीं कामं आपण करावींत ? रोज आई काय कामं करते हेंच मला मुळीं माहीत नव्हतं. जेवायला हाक मारली, कीं येऊन जेवायला बसायचं, या पलिकडे जेवण कसं तयार केलं जातं याचीही मला कल्पना नव्हती.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी उठलें आणि आई काय काय कामं करते तें लक्ष लावून पाहूं लागलें. आई भल्या पाहाटे उठत असे. मीही त्या दिवशीं लवकर उठलें. तें पाहून आई म्हणाली, "काय ग, लवकर कशाला उठलीस ? झोंप लागली नाहीं वाटतं रात्रीं ? कुठं दुखतं—खुपतं आहे का ?"

"कांहीं नाहीं होत. आपली उगीचच !" मी म्हटलं, "तूं कां उठतेस लवकर म्हणून मी उठलें." माझं उत्तर न ऐकलंसं करून आई कामाला लागली.

मी जवळ जवळ मुकादमीच करीत होतें म्हणा ना. उठल्यापासून आई काय करते याच्यावर माझं सारखं लक्ष होतं. आणि तें लक्ष ठेवीत असतांना त्यांतली कोणतीं कामं आपल्याला करतां येतील याचा मी अंदाज घेत होतें. त्या दिवशीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत मी सारीं कामं लक्षपूर्वक पाहिलीं नि दुसऱ्या दिवशीं सकाळींच आई ज्या वेळीं तांदूळ निवडायला बसली त्यावेळीं मी जाऊन तिला मदत करूं लागलें.

आश्चर्यचकित होऊन आईनें माझ्याकडे बघितलं, पण ती कांहीं बोलली नाहीं. निवडलेले तांदूळ घेऊन आई सैपाकघरांत गेली. आईनं आणून ठेवलेली भाजी मी मागीलदारीं जाऊन धुऊन सैपाकघरांत आई-जवळ आणून दिली.

पुन्हां ती आश्चर्यचकित झाली. मी केरसुणी हातांत घेतली आणि केर काढायचा प्रयत्न केला. केरसुणी माझ्यापेक्षां देखील उंच होती. ती मला कांहीं केल्या सांवरेना. हंसत हंसत आईनं केरसुणी माझ्या हातून घेतली आणि केर काढायला सुरवात केली. मला थोडंसं

वाईटच वाटलं; पण आपल्याला केर काढतां यायचा नाहीं हें आई केर काढीत असतांनाच मला पटलं आणि म्हणून मी दुसरं कोणतं तरी काम करण्याकडे नजर वळवली. किती वेळ विचार करून पाहिला पण मी करतां येण्याजोगं काम कोणतंच आढळून येईना. भाजी चिरून ठेवावी असं एकदां माझ्या मनांत आलं होतं; पण विळी पाहिली म्हणजेच जिथं मला भीति वाटत होती तिथं भाजी चिरण्याचा प्रश्न कुठला ?

स्नान करण्यासाठीं आई निघून गेली असं पाहून मी सैंपाक घरांत बसलें. माझं डोकं सारखं भ्रमण करीत होतं. कोणतं काम करावं हें सुचत नसल्यामुळं माझा जीव वळवळल्यासारखा झाला होता. आईचा मला राग आला. तिनं नाहीं का सांगू कांहीं ? काम करायला मी तयार झालें आहे एव्हढं कळल्यावर तरी तिनं कोणतं काम मी करावं तें दाखवून द्यायला पाहिजे होतं. पण ते नाझर म्हणाले तेंच खरं—मुलीला वळण कसं लावावं हें माझ्या आईला कळत नव्हतं हेंच खरं.

आई आंग धुवून आल्यावर मीही न्हाणीवर गेलें. परकर चोळी बदलून पुन्हां एकदां माजघरांतला केर काढण्याचा प्रयत्न करूं लागलें. पुन्हां आई आली आणि तिनं खसूकन माझ्या हातांतली केरसुणी काढून घेऊन केर काढायला सुरवात केली. तिनं केरसुणी काढून घेतली त्यावेळीं ती आतां रपाटा देणार असंच वाटलं होतं, पण सुदैवानं तिनं तसं कांहीं केलं नाहीं.

केर काढून आई घरांत गेली असं पाहून मी पाट ठेवायला सुरवात केली. मी पाट ठेवीत असतांना आई शेजारीं उभी राहून नुसती पहात होती. कांहीं पाट जड होते नि कांहीं हलके होते. कशीबशी मेटाकुटीनें मी आपलं काम उरकीत होतें. पाट ठेवून झाले त्यावेळीं मला असं वाटलं, कीं ते एका ओळींत कांहीं आले नाहींत. मी बाजूला जाऊन पाहिलं नि पुन्हां येऊन शक्य तितक्या सरळ रेषेंत ते पाट मांडले.

पाण्याच्या हंड्याजवळ आई तांबे भांडीं भरून ठेवीत होती. तो एकेक तांब्या आणून मी प्रत्येक पाटाजवळ ठेवला. मी तांबे मांडीत

होतें इतक्यांत नाझर आले आणि मी काम करतें आहें असं पाहून म्हणाले, " वाः पोरी, असंच कांहीं तरी काम करीत जावं. कांहीं तरी करायचं म्हणून मनांत आणलं म्हणजे आपोआपच काम समोर येतं. एकंदरींत माझ्या बोलण्याचा उपयोग झाला म्हणायचा. असंच हिला वळण लावा हं सत्यभामाबाई. "

सैंपाकघरांत आई चुलीजवळ काम करीत होती, तिथूनच म्हणाली, " तिचं तीच करते आहे, मी कांहीं सांगितलं नाहीं तिला. "

" ठीक ठीक, " नाझर म्हणाले, " तिचं तीच करीत असली तर मोठं कौतुक आहे म्हणायचं ! "

आईचे ते उद्गार कांहीं मला आवडले नाहींत. ' तिचं तीच करते आहे ' म्हणजे काय ? मी काम करीत होतें तें आईला आवडत का नव्हतं ? पसंत कां नव्हतं ? ' तिचं तीच करते आहे. ' असं म्हणून तिनं मला टोमणा दिला असं मला वाटलं. मी म्हणालें, " हो माझं मीच करतें आहें. आई सांगतच नाहीं मला कांहीं—मग मी तरी काय करावं ! "

" खरं आहे तें, " आई म्हणाली, " काम करायच्या निमित्तानं आजची शाळा चुकवलीस. "

आईचा मला फार राग आला. मी जी तिथून तडक निघालें ती निजायच्या खोलींत जाऊन बिछान्यावर अंग टाकून रडूं लागलें. एव्हढं काम केलं त्याचं कांहीं चीजच नाहीं ! शाळा चुकवण्यासाठीं का मी काम करीत होतें. एव्हढया मोठ्या गृहस्थानं सांगितलं म्हणून माझ्यापरीनं मी प्रयत्न करून पाहिला, तरी आईनं माझ्यावर असा आरोप करावा ! तेव्हांच्या तेव्हांच मी निश्चय केला, यापुढं आईच्या कुठल्याही कामाला कधींही हात लावायचा नाहीं. शाळेंत मात्र अगदीं वेळच्या वेळेवर जायचं.

दुसऱ्या दिवसापासून शाळेंत जाण्याचें काम मी अखंड सुरू केलं, नि एकही दिवस मी गैरहजर राहिल्याची तक्रार येऊं दिली नाहीं.

# प्रकरण २
## आम्हीं मुंबईला आलों

अशींच एक दोन वर्षं निघून गेलीं. त्या मुदतींत म्हणण्याजोगं कांहीं झालं नाहीं. नाझर आमच्या खाणावळींतून निघून गेले होते. त्यांनीं बिन्हाड केलं होतं. ते मधून मधून येतां जातां आमची चौकशी करीत असत.

कांहीं दिवसांनीं तेही तिथून बदली होऊन निघून गेले. त्या वेळीं खाणावळींत जी इतर मंडळी होती त्यांच्यापैकीं कुणीच माझ्याबद्दल सहानुभूति बाळगणारी नव्हती. मी त्यांच्या खिजगणतींतही नसें. केव्हां केव्हां एकादा 'हें आण, तें आण,' म्हणून मला हुकूम सोडी; पण आई त्यांना सरळ सांगत असे, कीं मुलीला कांहीं काम सांगायचं नाहीं.

माझा एक समज ठाम झाला होता, कीं शाळेंत जाणं आणि शिकणं, या पलिकडे मला दुसरं काम नाहीं. नाझरांच्या मताप्रमाणें मी घरचं काम केलं पाहिजे होतं. पण, मी नुसतं शिकावं, घरचं कांहीं काम करूं नये, अशी जोपर्यंत आईची इच्छा होती तोंपर्यंत घरचं काम करण्याचा प्रयत्न मी पुन्हां केव्हांच केला नाहीं.

हळूहळू आमच्या खाणावळींतून माणसं कमी होऊं लागलीं. गावांत आणखी एक दोन खाणावळी नवीन उघडल्या गेल्या होत्या त्यांच्यांत माणसांची वाटणी होऊं लागली आणि आमची खाणावळ जवळ जवळ बंद पडायच्या बेताला आली.

एके दिवशीं रात्रीं आई मला जवळ घेऊन रडत बसली होती. मला उद्देशून ती केव्हांच कांहीं बोलत नसे; पण काय झालं कुणाला ठाऊक, ती त्या दिवशीं मलाच उद्देशून बोलूं लागली. म्हणाली, " काय तुझं नशीब आहे पोरी देव जाणे ! अशी अनाथ पडलें म्हणून हा खाणा-वळीचा धंदा सुरु केला. नातेवाइकांनीं आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं नांवं ठेवलीं त्याची पर्वा केली नाहीं म्हणून आजवर दोन घास खायला मिळाले; पण आतां तेंही साधन जाणार असं दिसतं. काय करावं—कांहीं सुचत नाहींसं झालं आहे. "

मला वाटलं, आपल्याला तरा कांहीं उपाय सुचला असता तर तिला यावेळीं सांगितला असता. मी किती प्रयत्न करून पाहिला, पण मला कांहीं उपाय सुचला नाहीं. कांहीं तरी बोलायचं म्हणून मी म्हटलं, " हे आमच्याकडे जेवायला येणारे लोक कोर्ट कचेऱ्यांत जातात तशी तू कां जात नाहींस ? "

शून्यपणानें हंसत आई म्हणाली, " अग ते पुरुष आहेत. बायका कोर्ट कचेऱ्यांत गेलेल्या कधीं पाहिल्या आहेस का ? "

माझ्या प्रश्नाबद्दल माझं मलाच हसूं आलं. "मग आतां काय करायचं?"

आई माझ्या डोक्यावर हात फिरवीत होती. तिला काय वाटलं कुणाला ठाऊक, तिनं चटकन माझी हनवटी उचलली आणि माझं तोंड उचलून माझ्याकडे डोळे भरून पाहिलं. आईला वाईट वाटूं नये म्हणून मी हंसतमुख राहण्याचा प्रयत्न करीत होतें—पण कां कोण जाणे, मला चट्कन रडण्याचा हुंदका आला. मी रडतें असं पाहून आईही रडूं लागली.

रडत रडतच ती म्हणाली, " देव काय मार्ग दाखवील तो खरा. प्राण गेला तरी कुणापुढं हात पसरायला मी जायची नाहीं. माझं नशीब मी हातीं घेतलं आहे, ती कांहीं झालं तरी दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहायची नाहीं. तुला काय वाटतं वेणू ? मुंबईला जाऊं या का आपण ? "

" मुंबईला ! " मी विचारलं, " मुंबईला म्हणजे कुठं ? "

" तें खरं, " आई म्हणाली, " तुला काय कळणार मुंबई. मुंबईला म्हणजे असं. इथून बोटींत बसायचं आणि भलं मोठं एक गांव आहे तिथं जायचं. त्या गांवाला म्हणतात मुंबई. ज्याला पोटापाण्याला मिळत नाहीं अशीं सारीं माणसं त्या मुंबईला जातात नि चांगलीं गबर होऊन देखील येतात. तेव्हां आपण त्या मुंबईलाच जाऊं. "

" असं ? " मी टाळ्या पिटीत म्हटलं, " जाऊं बरं—आपण मुंबईलाच जाऊं. "

आई आपल्याशींच बडबडली, " हा देवाचा कौल मिळाला म्हणायचा ! "

आई काय म्हणाली हें मला त्यावेळीं समजलं नव्हतं. आपण मुंबईला जायचं, या कल्पनेनं मी आनंदित झालें होतें. मुंबईला जायचं म्हणजे काय ? मुंबई कुठं आहे ? आमच्या गांवापेक्षां मोठी म्हणजे किती मोठी ! तिथं जाऊन आपण करणार तरी काय ? याची कोणतीच कल्पना मला नव्हती.

असेच आणखी कांहीं दिवस गेले. मुंबईला जाण्याची गोष्ट त्यानंतर आईनं काढली नाहीं. मला वाटलं, मुंबईला जायची आलेली लहर गेली. आतां कांहीं आपण मुंबईला जात नाहीं. मुंबईला जाण्यांत सुख होतं कीं दुःख होतं याची जरी मला कल्पना नव्हती, तरी एकंदरींत मला वाईटच वाटलं.

दिवसेंदिवस खाणावळींतील माणसं कमी होतां होतां एकदोघेच जेवायला येऊं लागले होते.

एके दिवशीं आईनं खाणावळ बंद केली. एकदोन दिवस कांहीं न करतांच गेले, पण आई कांहीं तरी उद्योगांत होती. रोज ती कुठं ना कुठं तरी जात असे. कुठं जात असे, काय करीत असे, याची मला मुळींच कल्पना नव्हती. पण एके दिवशीं जेव्हां तिनं सामानसुमान

बांधायला सुरवात केली त्यावेळीं मला वाटलं कीं आतां आपण मुंबईला जाणार.

'मुंबईला जाणार' असं कांहीं आईनं सांगितलं नाहीं. मीही विचारलं नाहीं. ती होऊन सांगेपर्यंत कांहीं विचारायचं नाहीं, असंच मी ठरवलं होतं.

एक दिवस आम्ही जायला निघालों. सामानसुमान घेऊन बोटीवर चढलों; पण आपण कुठें जाणार, हें कांहीं आई बोलली नाहीं.

तो बोटीचा प्रवास मला पहिलाच होता. एव्हढ्याशा जागेंत किती तरी माणसं कोंबलेलीं पाहून माझा जीव कासावीस झाला. मी बोटीच्या कठड्यावरून बाहेर पाहिलं. जिकडे तिकडे पाणीच पाणी दिसत होतं. आतां या पाण्यांतून आपण जाणार कुणीकडे, असा प्रश्न माझ्या मनांत उत्पन्न झाला.

आमच्या शेजारीं बसलेल्या एका बाईनं विचारलं तेव्हां 'आपण मुंबईला जात आहों' असं जेव्हां आईनं सांगितलं तेव्हां माझा जीव खालीं पडला. समुद्राचं पाणी पाहून घाबरून गेलेला माझा जीव, आपण कुठंतरी मुक्कामाला जात आहोंत असं कळतांच, ठिकाणावर आला.

बोट कितीतरी वेळ पाण्यांत होती. मधून मधून होड्या भरभरून माणसं येत, नि बोटींत चढत, तसतशी गर्दी वाढत होती. सारींच माणसं मुंबईला जाणारीं आहेत कीं काय, असा प्रश्न माझ्यापुढं उभा राहिला. पण कांहीं कांहीं माणसं ज्यावेळीं बोटींत येत त्याचवेळीं उतरून जात असत, हें पाहून घराकडून निघालेलीं सारींच माणसं कांहीं मुंबईला जात नाहींत, हें मला कळून आलं.

रात्र होत आली. माझा डोळा लागला. मी जागी झालें तेव्हां जिकडे तिकडे गडबड सुरू झाली होती. बोट चालायची थांबली होती. कठड्यावर डोकावून मी पाहिलं तों भली मोठी भिंत समोर असलेली मला दिसली. दुसऱ्या बाजूकडे जसं पाणी दिसत होतं तसे मधून

मधून दिवे लुकलुकत असलेले दिसत होते. हा काय प्रकार आहे याची मला कल्पना येईना.

तांबडा पोषाख केलेले कांहीं लोक एकदम तिथं आले आणि आमचं सामान उचलून घेऊं लागले. तेव्हां आई म्हणाली, "चल, आली मुंबई, आलों बरं आपण आतां मुक्कामाला!"

बोटीचा जिना चढून आम्हीं वर गेलों. तिथं बोटीबाहेर जाण्याकरितां जी एक फळी टाकली होती तिच्यावरून आम्हीं जमिनीवर गेलों. तिथं माणसांची खच्चून गर्दी झाली होती. रस्त्यावर खांबावरून लावलेले उंच उंच दिवे पाहून मला फारच आश्चर्य वाटलं.

एक गाडी करून आम्ही चालू लागलों. ती गाडीही मोठी चमत्कारिक होती. तिला एकच घोडा होता पण तींत बसायला जागा चांगली ऐसपैस होती.

रस्त्यावरून आम्ही जाऊं लागलों त्या वेळीं घोडाबिडा कांहींच नसलेल्या केव्हढया तरी मोठ्या गाड्या घरघर आवाज करीत खूप वेगानं पळत असलेल्या पाहून मी घाबरून गेलें. तशाच कांहीं लहान गाड्या अशाच आपोआप रस्त्यावर चालत होत्या. ते सगळे चमत्कारिक प्रकार पाहून माझा जीव डोळ्यांत आला. मुंबई म्हणजे एक फार मोठं गांव आहे, असं आईनं मला सांगितलं होतं खरं—पण तें गांव एव्हढं अफाट असेल अशी माझी कल्पना नव्हती.

आम्ही एका मोठ्या घराशीं येऊन थांबलों. सामानसुमान उतरून काढून घेतलं आणि तिथंच विडी फुंकीत असलेल्या एका गड्याच्या डोक्यावर देऊन आम्ही त्या घरांत प्रवेश केला. जिन्यामागून जिने चढून आम्ही जात होतों.

आम्ही किती जिने चढून गेलों याचा आम्हांला अंदाज लागला नाहीं. ज्या वेळीं आम्ही सर्व जिने चढून गेलों त्या वेळीं जिकडे तिकडे सारीं दारंच दारं लागलीं. आई प्रत्येक दाराजवळ जाऊन चौकशी करीत होती.

शेवटी एकदांचा आमचा मुक्काम सांपडला आणि त्या दाराशीं आम्ही सामान उतरून घेतलं. दार उघडण्यासाठीं जे गृहस्थ आले होते ते साधारण दुर्मुखलेलेच दिसत होते. मला वाटलं, आम्ही आल्यामुळं त्यांच्या चेहेऱ्यावर तशी छाया आली असावी. पण पुढं मला कळून आलं कीं त्यांचा चेहेराच तसा दुर्मुखलेला होता.

ते माझे दूरचे मामा होते. आईला पाहतांच ते म्हणाले, " आलीस ! हें सामान किती आणलं आहेस बरोबर. तुम्हां दोघांचाच इथं समावेश कसा होईल, या काळजींत मी होतों. इथं हें तुझं सामान कुठं ठेऊन देऊं आतां ? "

कांहीं न बोलतां आई आंत गेली. मीही तिच्याबरोबर आंत गेलें. आंतून एक बाई डोळे चोळीत चोळीत बाहेर आली. तिचा चेहरा दुर्मुखलेला नव्हता तरी तिला पहातांच आपलेपणाची भावना कांहीं मनांत जागृत होत नव्हती. मला वाटलं, आम्हीं आलों हें पाहून तिला कांहीं आनंद झाला नाहीं.

गोंदुमामांच्या घरीं आम्ही मुक्काम ठोकला खरा; पण आम्हांला कांहीं फारशा लोभानं वागवलं जात नव्हतं. आईनं आपला विचार त्यांना जेव्हां कळवला तेव्हां ते म्हणाले, " हें तुझं करणं कांहीं आपल्याला आवडत नाहीं. तिकडे गांवीं खाणावळ घातली होतीस, इकडे कांहीं कळत नव्हतं, तोंपर्यंत बरं होतं. मी इथं हायकोर्टांत असतों. माझा दर्जा फार मोठा आहे. दूरच्या कां होईना—पण माझ्या बहिणीनं मुंबईत खाणावळ घातली आहे हें जर माझ्या ऑफिसांत कळलं, तर मला तोंड दाखवायला जागा रहाणार नाहीं. "

" मग मी काय करूं ? " आईनं विचारलं, " दुसरा काय आधार आहे मला ? कुठं सैपाकिणीचं काम मिळेल का मला ? "

डोकं खाजवीत खाजवीत गोंदूमामा म्हणाले, " तें मी कसं सांगूं ! ' माझ्या बहिणीला सैपाकीण ठेवतां का ' असं मी कुणाला कसं

विचारूं!—" बोलत असतांना ते त्या लहानशा खोलींत येरझारा घालीत होते. मधेंच थांबून ते म्हणाले, "ऐकलंस, तुला एक सांगून ठेवतों; तू खाणावळ काढ कीं सैपाकीण रहा; पण तूं माझी बहीण आहेस म्हणून कुणाला सांगूं नकोस. माझ्या गांवची एक बाई आली आहे, असंच मी शेजाऱ्यापाजाऱ्यांनां सांगितलं आहे. तूं बहीण म्हणून सांगितलंस तर माझी फजिती होईल."

त्या वेळीं आईनं जो चेहेरा केला तो अजून माझ्या डोळ्यांपुढं दिसतो आहे.

त्या दिवशीं दुपारीं, मला तशीच गोंदूमामांच्या खोलींत ठेवून आई कुठं निघून गेली. गोंदूमामांची बायको पदोपदीं माझ्या अंगावर वसवस करून ओरडत होती. केव्हां एकदां या जागेंतून जातों असं मला झालं होतं. मला वाटलं, बरीं सुखाचीं गावीं होतों, कशाला आई या मुंबईत आली?

संध्याकाळीं जी आई आली ती निघण्याच्याच तयारीनं आली. सारं सामानसुमान गोळा करून आम्हीं तिथून निघालों नि गाडींत बसून पुन्हां आमचा प्रवास सुरू झाला. रस्त्यांतून गाडी जात असतांना जीं दृश्यं दिसत होतीं, त्यांचा माझ्या मनावर चमत्कारिक परिणाम होत होता. आज मुंबईचं मला फारसं वाटत नाहीं; पण त्यावेळीं रस्त्यावरून जाणाऱ्यायेणाऱ्या लोकांची ती धांदल, घोड्यांच्या आणि बिन घोड्यांच्या गाड्यांची ती पळापळ, आपोआप चालणाऱ्या भल्यामोठ्या गाड्यांची ती घरघर, त्या सर्वांमुळं माझा जीव अगदीं घाबराघुबरा झाला होता. आम्हीं कुठं जात आहोंत, याचा मला पत्ता नव्हता नि माझ्या नित्याच्या रितीप्रमाणें मी आईला विचारलं पण नाहीं. आमची गाडी एका मोठ्या चढावावरून चालायला सुरवात झाली.

तें सर्व सामान सुमान घेऊन आम्हीं एका मोठ्या घराशीं उतरलों.

हें घर गोंदूमामा राहात होते तसं खोल्याखोल्याचं नव्हतं. आमच्या

गांवच्या घरांसारखं होतं, पण बरंच मोठं होतं. त्या घराला दरवाजेच दरवाजे आणि खिडक्याच खिडक्या होत्या.

गाडी त्या घराच्या पुढच्या दारानं न जातां मागल्या बाजूला नेण्यांत आली होती. सामानसुमान बाहेर ठेवण्यांत आलं. बाहेर असलेल्या नळावर आम्हीं हात पाय धुतले आणि घरांत आलों. आम्हीं आलेल्या पहातांच एक बाई हंसतमुखानं बाहेर आली. भिंतीवर टांगलेल्या चित्रांत जशा बाया असतात तशी ही बाई दिसत होती. तिला पहातांच मला तिच्याबद्दल आदर वाटूं लागला.

मला पाहतांच तीं म्हणाली, "ही मुलगी का तुमची, बाई ? काय हिचं नांव ?" आईनं माझं नांव सांगतांच तीं पुढं म्हणाली, "वेणू का ? नांव तर मोठं गोड आहे; पण अलीकडे कुणी हीं असलीं नांवं ठेवीत नाहींत. कमला, विमला, प्रमिला, असं कांहीं नाव ठेवायचं कीं मुलीला ! बरं झालं, एक मुलगी घरांत आली. मुलगी व्हावी असं मला वाटे, पण देवानं तें भाग्य कांहीं अजून मला लाभूं दिलं नाहीं. ही मुलगी आली—बरं झालं ! बरं का वेणू, आतां आई ही नव्हे, तुझी आई मी बरं का ! मला आई म्हणत जा" तिनं ओढून मला आपल्या जवळ घेतलं आणि माझ्या हनवटीखालीं हात घालून माझं तोंड वर करून माझ्या चेहेऱ्याकडे पाहात म्हणाली, "मोठी गोड पोरगी आहे.—नाहीं तर हीं आमचीं मुलं !—बरं का वेणू, आज पासून मी तुझी आई !"

माझा हात धरून ती ज्या वेळीं मला घरांत घेऊन जाऊं लागली त्या वेळीं माझं हृदय भरून आलं.

मी मागं वळून पाहिलं, तों आईच्या डोळयांतून आसवं टपटप गळत होतीं.

## प्रकरण ३

## मला आई मिळाली

ज्या घरीं आम्हीं येऊन राहिलों होतों तें घर एका सुखवस्तू श्रीमंत गृहस्थाचं होतं. ते पूर्वी कोणच्याशा सरकारी खात्यांत ऑफिसर होते. आतां त्यांनीं पेनशन घेतलं होतं. बाईसाहेब या त्यांचं दुसरं कुटुंब होतं.

बाईसाहेबांना तीन मुलगे होते. तिघेही शाळेंत जाणारे होते.

घरच्या व्यवस्थेच्या बाबतींत साहेब फारसं पाहात नसत, किंबहुना जेवणाखेरीज ते घरांत येत सुद्धां नसत. त्यांच्या घरीं येणाऱ्या जाणाऱ्यांची बरीच रहदारी असे; पण तीं कोण माणसं येत आणि कां येत याची त्या वेळीं तरी मला कांहींच कल्पना नव्हती.

पहिल्या दिवशीं माझा पाट सर्वांच्या पंगतीबरोबर मांडला त्या वेळीं बाईसाहेबांचे वडील चिरंजीव बाळासाहेब यांनीं तक्रार केली. त्यांनीं जे शब्द उच्चारले त्यांतली वक्रोक्ति जरी मला कळली नव्हती, तरी ते उच्चारतांना त्यांनीं ज्या प्रकारचा आविर्भाव केला होता, त्याचंच मला वाईट वाटलं.

साहेब कांहीं बोलले नाहींत पण बाईसाहेब म्हणाल्या, “ तुमच्या पंगतीला मी तिचा पाट ठेवला आहे आणि तिथंच ती बसणार. असलीं कुजकीं नासकीं बोलणीं मी मुळींच ऐकून घेणार नाहीं.”

बाळासाहेब संतापले आणि वाढलेल्या ताटावरून उठून निघून गेले. ाटावर बसावं कीं नाहीं याचा मी विचार करीत होतें, तें पाहून बाई- ाहेब मोठ्या प्रेमळपणें म्हणाल्या, " तू बस हं वेणू या पाटावर. रोज ्थंच बसायचं बरं तूं. बाळ गेला त्याचं कांहीं वाईट वाटायला नको ्व्हढं. त्याला भूक नाहीं आज—म्हणून गेला तो निघून. "

मी जेवायला बसलें खरी पण मला अन्न गोड लागेना. भूक नव्हती ्हणून बाळासाहेब गेले नाहींत, हें मला उघड उघड दिसत होतं. पण ाईसाहेबांचा हुकूम म्हणून मी मुकाट्यानं जेवत होतें.

अर्धी जेवणीं झाल्यावर साहेब बाईसाहेबांना म्हणाले, " असं पहा, ्हिला उद्यापासून तुझ्याच पंगतीला घेऊन जेवायला बसत जा ना ! हीं ्मुलं कांहीं ऐकायचीं नाहींत. उगीच त्या पोरीला तरी संकोच कां म्हणून ? मी पाहतों आहें मघापासून, ती नीटशी कांहीं जेवत नाहीं. आज हा एक जेवणावरून उठून गेला. उद्यां तिघेही जातील. "

" गेले तर गेले, " बाईसाहेब म्हणाल्या. " माझ्या घरांत सारं कांहीं माझ्या शिस्तीप्रमाणं झालं पाहिजे. मी तिला माझी मुलगी म्हटलं आहे नि मी तिला माझ्या मुलीसारखीच वागवणार. "

" मोठी गंमत आहे तुझी, " साहेब म्हणाले. " लोक मुलगा व्हावा म्हणून नवस करतात; आणि तुला हा सोस. "

बाईसाहेब थोड्याशा रागानें म्हणाल्या, "ज्याची आवड त्याच्याजवळ, माझी आवड आहे ही अशी आहे. ज्याला कुणाला पटत नसेल त्यांनीं पटवून घेऊं नये. "

जेवणं झालीं नि आई चुलीजवळ काम करीत होती तिच्या शेजारीं मी जाऊन बसलें. आई इथं कां आली, या लोकांचं आणि आपलं नातं काय, याची मला कांहींच कल्पना नव्हती. आईला विचारावं असं माझ्या मनांत येत होतं, पण नित्याची संवय आड आली. पण आई जेव्हां बोलली तेव्हां बऱ्याच गोष्टींचा उलगडा झाला.

आजूबाजूला कुणीं नाहीं असं पाहून आई मला म्हणाली, "ऐकलंस वेणे, इथं आपण परक्याच्या घरांत आलों आहोंत. तीं श्रीमंत माणसं आहेत, आपण गरीब माणसं आहोंत. मी इथं आलें ती त्यांची सैपाकीण म्हणून. बाईसाहेबांचा स्वभाव मोठा प्रेमळ आहे. त्यांचं मन तुझ्यावर बसलं आहे खरं, पण आपण आपल्या पायरीनं वागलं पाहिजे, हें ध्यानांत ठेव. त्यांनीं कितीही मोठेपणा दिला तरी तूं माझी मुलगी आहेस—बरं सैपाकणीची मुलगी आहेस!—बाळासाहेब म्हणाले ते कांहीं खोटं नाहीं. आम्हीं या घरांत नोकर माणसं आहोंत. खरं पाहिलं, तर नोकर मी आहें, तूं नाहींस, तूं इथली पाहुणी,—पण धर्माची, सत्तेची नव्हे. समजलं मी काय म्हणतें तें? तेव्हां बाईसाहेबांनीं किती जरीं म्हटलं, तरी आपल्या पायरीनं वागत जा."

आईच्या भाषणाचा अर्थ मला चांगलासा कळला नाहीं. धर्माचीं माणसं म्हणजे काय नि सत्तेचीं माणसं म्हणजे काय यांतला भेद मला कळत नव्हता. नोकरी म्हणजे काय आणि नोकरांनीं वागायचं कसं, याचीही मला कल्पना नव्हती. आम्हीं गांवीं होतों. आमची खाणावळ होती. त्यावेळीं आमच्या घरीं गडी होता, तो आमचा नोकर, असं म्हणत असत. तशीं गड्यासारखीं का आम्हीं? खाणावळ म्हणजे काय, घर म्हणजे काय, नि सैपाकीण म्हणजे काय, हेंही मला चांगलंसं कळत नव्हतं. पण या लोकांपेक्षां आपली पायरी कांहीं तरी निराळी आहे, तीं वागतात तसं आपण वागूं नये, एव्हढं मात्र माझ्या ध्यानीं आलं.

मी आईला विचारलं, "आई, सैपाकीण म्हणजे ग काय?"

पदरानं डोळे पुशीत आई म्हणाली, "आतां कसं सांगूं तुला? ही बाग, हें घर आहे त्यांचं—म्हणजे साहेबांचं आणि बाईसाहेबांचं. बाईसाहेब श्रीमंत आहेत. श्रीमंत माणसं स्वतः सैपाक करीत नाहींत, म्हणून सैपाक करण्यासाठीं त्यांनीं मला नोकर ठेवलं आहे. जेवायला

घालून मला पगार देणार आहेत. नि तूं माझी मुलगी म्हणून मोहोबती-खातर त्यांनीं तुझाही भार सहन करण्याचं कबूल केलं आहे."

आईच्या त्या भाषणावरून मला जरी चांगली कल्पना आली नाहीं तरी होती त्यापेक्षां आपली स्थिति बदलली. एव्हढं मात्र मला चांगलंच जाणवलं. इथं आपण स्वतंत्र नाहीं, दुसऱ्याचीं ताबेदार आहोंत नि ते दुसरे सांगतील तसं आपल्याला वागलं पाहिजे, अशी अंधुक कल्पना त्या माझ्या बालबुद्धीला जाणवली.

बाईसाहेबांचे तिन्ही मुलगे मला तुच्छतेनं लेखीत असत. वारंवार कांहीं ना कांहीं तरीं कामं सांगत. हें आण, तें आण, हें नेऊन ठेव तें नेऊन ठेव, असे सारखे हुकूम करीत नि मी मुकाट्यानं ते पाळीत असें. पण मला असं काम सांगितलेलं जेव्हां बाईसाहेबांच्या नजरेला येई, त्या-वेळीं त्या मुलांच्या अंगावर खेकसून ओरडत असत. त्या म्हणत, "का रे तिला कामं सांगता ? दुसरीं नोकर माणसं नाहींत का घरांत ! चांगले दोन गडी आहेत. माळी आहे. गाडीवाला आहे. काय सांगा-यचं असेल तें गड्यांना सांगा; पण माझ्या वेणूला जर कामं सांगितलींत तर ती गोष्ट माझ्या कामावर पडायची नाहीं."

बाईसाहेब जरी असं बोलत असत तरीं बाळासाहेब आणि त्यांचे भाऊ कांहीं आपला हेका सोडीत नसत नि मीही केव्हां त्यांचा आज्ञा-भंग करीत नसें.

मला मुद्दाम त्रास द्यावा असाच त्यांचा उद्देश असे. केव्हां केव्हां जरुर नसतांना मला उगीच काम सांगत, म्हणजे मी तक्रार करावी, बाईसाहेबांना सांगावं नि मग माझा पाणउतारा करावा, असा त्यांचा उद्देश असे. पण मी तशी संधि त्यांना कधींच दिली नाहीं.

आईचा स्वभाव फार सोशीक म्हणून तीही, बाळासाहेबांनीं तिला कितीही त्रास दिला तरी, कांहीं बोलत नसे. तीं मुलंच मोठीं व्रात्य होतीं. आपसांत सुद्धां मारामाऱ्या करीत असत. साहेब कुणाचीच कधीं चौकशी

करीत नसत. कुणी दंगा करो, कीं मारामारी करो, ते कुणाला कधीं ओरडलेले किंवा रागावलेले मला ऐकूं आले नाहींत. बोलायच्या काय त्या बाईसाहेब, पण मुलं त्यांचीं मुळींच खिजगणती धरीत नसत.

बाईसाहेबांना माझा लळा फार लागला होता. तिथं आल्यापासून त्यांनीं माझी सारीच राहाणी बदलून टाकली होती. खणाची परकर चोळी नेसून मी घरांत आलें, पण आतां माझ्या अंगांत रेशमी चिटाचे झगे आले होते. बाईसाहेबांबरोबर जात असें त्यावेळीं पायांत बूट-स्टॉकिंग देखील घालीत असें. त्या पोषाखांत मला पाहिलं म्हणजे आईचं हृदय भरून येई.

खरं पाहिलं, तर तिला तो तसला पोषाख आवडत नसे. खणाची परकर चोळी तीच आपल्या सत्तेची–तीच आपल्या भाग्याची–ती आज टाकली नि रेशमी झग्यांची सवय लागली तर पुढं पुन्हां खणाच्या परकर चोळीवर येणं मला कठीण जाईल, असं ती म्हणे.

पण पुन्हां खणाची परकर चोळी कां येईल, याची मला कांहींच कल्पना नव्हती. मी इथं आलें ती कायमची आलें, अशीच माझी ठाम समजूत झाली होती. तिथून आम्हीं जाऊं, असं मानायला कांहींच कारण नव्हतं. मला वाटे, आईला हें उगीच भय वाटतं. बाईसाहेबांची माझ्यावर एव्हढी माया—त्या मला कशा घालवून देतील !

पण आई म्हणे, "केव्हां काय होईल हें कुणी सांगावं ! गांवची खाणावळ बंद पडेल असं का मला पहिल्यांदा वाटलं होतं ? पण ती बंद करून इथं यावं लागलंच ना मला ? सैंपाकणीची नोकरी का होईना पण ती चटकन् मिळणं थोडंच सोपं असतं. ही अगदीं सहजासहजीं मिळाली–एवढासुद्धां प्रयत्न न करतां मिळाली–म्हणूनच मला भीति वाटते. म्हणून म्हणतें, आपली मूळची स्थिति विसरूं नकोस. हे परक्याचं वैभव, चार दिवसाचे सोपस्कार, आज आहेत नि उद्यां नाहींत, म्हणून आपली जुनी आठवण ठेवून वागत जा म्हणजे झालं."

एकंदरींत आमचे दिवस मोठे आनंदांत जात होते. माझ्यासाठीं मुद्दाम बाईसाहेबांनीं घरी शिकवायला मास्तर ठेवला होता. शाळेंतही मी जात असें. साहेब जरी फारशी माझी चौकशी करीत नसत तरी त्यांना मी आवडत नसें असं नाहीं. माझ्या शाळेंतल्या अभ्यासाची मधून मधून ते चौकशी करीत असत. दारांत वेण्या विकायला आल्या तर आपण होऊन माझ्यासाठीं विकत घेऊन देत. केव्हां केव्हां आपल्या बरोबर गाडींतून फिरायलाही नेत. पण बाईसाहेबांप्रमाणं त्यांनीं मला कधींही जवळ घेतलं नाहीं, कुरवाळलं नाहीं, कीं माझं कोडकौतुक केलं नाहीं.

माझ्या मनाला तें जाणवत असे. साहेबांच्या मनांत माझ्याबद्दल थोडा ना थोडा तरी दुजाभाव आहे, याची जाणीव मला होत असे. मुलं तो दुजाभाव स्पष्ट करून दाखवीत पण ते दाखवीत नसत, इतकंच नव्हे, तर बाईसाहेबांना बरं वाटावं म्हणून ते माझं कोडकौतुक करीत असल्याचं ढोंग करतात, असं मला वाटे. त्या कोडकौतुकांत त्यांचं अंतःकरण नव्हतं, हें मला त्यांच्या एकंदर चालचर्येवरून समजून येत असे.

बाईसाहेबांची मात्र माझ्यावर फार माया असे. मी त्यांची मुलगी नव्हे असं कुणाला सांगून सुद्धां खरं वाटलं नसतं, इतक्या आपुलकीनं त्या मला वागवीत असत. मी जवळ जवळ आईची ओळख विसरून गेलें होतें असं म्हटलं तरी चालेल. आईची गांठ पडायची काय ती झोपायच्या वेळेला. त्यावेळीं तीही काम करून थकलेली, म्हणून मला नुसती जवळ घेऊन झोंपीं जात असे. कधीं ती माझ्याशीं चार शब्द बोलली नाहीं.

बाईसाहेबांबरोबर मात्र माझी सारखी टकळी सुरू असे. मी जें जें कांहीं विचारीं, तें तें मला त्या समजावून सांगत. मी मुंबईत

आलें त्यावेळीं अगदींच गांवढळ होतें, पण थोडक्याच काळांत एक पक्की मुंबईकर बनलें, इतकी बाईसाहेबांची शिकवणूक माझ्या कामीं पडली.

मुलांनीं मात्र माझ्याशीं उभा दावा धरला होता. कांहीं झालं तरी मला ते आपल्या तोलानं वागवीत नसत. विशेषतः बाळासाहेबांचा कांहीं कारण नसतां माझ्यावर भारीच राग असे. कांहीं ना कांहीं तरी कुरापती काढून मला त्रास द्यायचा हा त्यांचा नित्यक्रमच होता. त्यांनीं माझ्याबद्दल असा राग कां धरावा, याची कल्पना त्या बालवयांत मला होत नसे. त्या घरच्या एकंदर व्यवहारांत मी इतकी रुळून गेलें होतें, कीं हें घर आपलं नव्हे, इथं आपण परकीं आहोंत, याबद्दलची माझी आठवण सफाई बुजून गेली होती.

आणि म्हणूनच मला बाळासाहेबांचा राग येत असे. मी त्यांना कधीं उलटून बोललें नाहीं कीं कधीं त्यांची अवज्ञाही केली नाहीं, असं असतां त्यांनीं मला त्रास कां द्यावा हेंच मला कळत नसे.

बाळासाहेबांचे दुसरे दोघे भाऊ वयानं लहान होते, तरीही ते माझ्यापेक्षां वयानं मोठे होते. ते मला तितकासा त्रास देत नसत. पण बाळासाहेबांची वागणूक कांहीं मुलखावेगळीच होती. बाईसाहेब समोर नसल्या म्हणजे कांहीं तरी कुरापत काढून मला मारायलादिखील ते कमी करीत नसत. पण त्याबद्दल मी बाईसाहेबांकडे कधींच चुगली केली नाहीं.

मी चुगली करीत नाहीं म्हणूनच बाळासाहेबांचा माझ्यावर जास्त राग असे. एक दिवस ते अगदीं उघड उघड म्हणाले, "आईच्या नकळत मी हिला इतका त्रास देतों, मारतों दिखील! तरीही ही कारटी आईला कांहीं कळवीत नाहीं. अगदीं निगरगट्ट आहे. मारल्याचासुद्धां परिणाम होत नाहीं तिच्यावर!"

ते त्यांचे उद्गार ऐकून मला आत्मविश्वास उत्पन्न झाला आणि म्हणूनच त्रास होत असतांही मी मुकाट्यानं सहन करीत होतें.

त्या भावंडांचा जरी मला त्रास होत होता तरी आमचं दिवस सुखानं जात होते. कांहीं कसलीच वाण पडत नव्हती.

पण आई म्हणाली तें कांहीं खोटं नाहीं. सारेच दिवस सुखाचे जात नसतात, हेंच खरं. त्या वेळेपर्यंत भाग्यादुर्भाग्याची जरी मला ओळख नव्हती तरी ज्यावेळीं बाईसाहेब आजारी पडल्या त्यावेळीं आईच्या म्हणण्याची प्रचीती मला पटूं लागली.

बाईसाहेबांच्या आजारीपणांत मी एक प्रकारें पोरकी झालें. मला त्रास देण्याच्या कामीं बाळासाहेबांना तितकाच चेव आला, आणि त्यांच्या अनुकरणानं इतर नोकरचाकर माणसंही मला डिवचूं लागलीं. साऱ्या सुखावर विरजण पडल्यासारखं झालं. बाईसाहेबांची प्रकृती दिवसेंदिवस जास्त जास्त बिघडत चालली आणि एके दिवशीं त्यांनी इहलोकची यात्रा संपवली.

अशा रितीनं मी अगदी सर्वस्वी पोरकी झालें.

# प्रकरण ४

## नवी खाणावळ उघडली

माणसं मरतात असं मी ऐकलं होतं, पण मरण म्हणजे काय, याची मला कल्पना नव्हती. माझ्या वडिलांच्या मृत्यूची मला मुळींच आठवण नव्हती त्यामुळं, बाईसाहेबांच्या मृत्यूनं मला केव्हढा तरी धक्का बसला.

वर्षभर आम्हीं त्यांच्या घरीं राहिलों होतों. त्या वर्षाच्या मुदतींत बाईसाहेबांनीं मला मुलीसारखं वागवलं होतं.

त्यांच्या आजारीपणांत सदोदित मी त्यांच्याजवळ असें. रात्रीं झोपायला सुद्धां आईजवळ जात नसें. एक क्षणभर देखील त्या मला आपल्या नजरेसमोरून दूर करीत नसत.

मला आश्चर्य वाटे तें हेंच, कीं नातं नाहीं, गोतं नाहीं, ओळखसुद्धां अगदी नवी, असं असतांना या परक्या बाईनं माझ्यावर एवढं प्रेम कां करावं ? त्यांच्या आजारीपणांत मला त्यांची ती ओढ फार जाणवत असे.

अगदीं त्यांच्या शेवटच्या घटकेपर्यंत मी जवळ होतें. प्राण सोडतांना माझा हात त्यांच्या हातांत होता तो नंतर सोडवून घ्यावा लागला. मरणकालच्या यातनांची स्थिति प्रत्यक्ष पाहिल्यामुळं माझ्या मनावर जबरदस्त आघात झाला.

मरणापूर्वीं कांहीं वेळ त्यांची वाचा गेली होती. नुसत्या खुणेनं त्या मला बोलावीत असत.

कांहींतरी चमत्कारिक होणार, असं मला वाटलं—पण तें चमत्कारिक होणं म्हणजे मृत्यू, हें मला माहीत नव्हतं.

त्यांचा प्राण निघून जातांच घरांत सर्वत्र हलकल्लोळ झाला. नोकर चाकर माणसंही रडूं लागलीं. कां रडतें आहे, हें कळत नसूनसुद्धां मीही हुंदके दे-देऊन रडत होतें.

त्यांचं प्रेत ज्यावेळीं उचलून नेलं त्यावेळीं आईनं मला उचलून दूर नेलं-नि नंतर बाकीचे विधी झाले असं मला मागाहून कळलं.

मृत्यू म्हणजे काय ? प्रेत म्हणजे काय ? त्याची उत्तरक्रिया म्हणजे काय ? वगैरे प्रश्न मी ज्यावेळीं आईला विचारले त्यावेळीं ती धड बोलेना देखील. पण दुसऱ्या दिवशीं तिनं बरंचसं समजावून सांगितलं. मेलेल्या माणसाला जाळून टाकतात, त्याचा मागमूस सुद्धां राहात नाहीं, हें ऐकून मला मोठं चमत्कारिक वाटलं. आतां बाईसाहेबांची पुन्हां गांठ होणं नाहीं या कल्पनेनं मी भांबावून गेलें होतें. मला त्यांचा केव्हढा तरी मोठा आधार वाटत होता. त्यांच्या मृत्यूच्या दुःखापेक्षां, माझं पुढं कसं होणार याच भीतीनं मी अगदीं घाबरून गेलें होतें. बाळासाहेब माझा आतां छळ करतील, त्यावेळीं त्यांना दटावणारं कुणींच नाहीं—साहेबांची वृत्ती मला माहीत होती–त्यामुळं मला आभाळ कोसळल्यासारखं वाटूं लागलं.

आई म्हणाली, " पाहिलंस. मी म्हणत होतें तें हें ! याला म्हणतात भाग्य. चांगलं सुखाचं स्थान मिळालं होतं पण तिथं देखील ईश्वर समाधानानं राहूं देत नाहीं. आतां इथं किती दिवस निभावतील हें कांहीं मला सांगतां येत नाहीं. "

मला देखील तसंच वाटलं. भाग्य भाग्य म्हणून जें कांहीं म्हणतात त्याची त्यावेळीं मला कल्पना आली.

दोन तीन आठवडे घरांत जिकडे तिकडे शुकशुकाट होता. कसेबसे रोजचे व्यवहार चालले होते. कुणींच कुणाशीं फारसं बोलत नव्हतं.

साहेब अगदीं सुन्न झाल्यासारखे झाले होते. मुलगे दिखील फारशी गड-बडं करीत नव्हते. पण महिना होत आला तसतसा तो काळ नाहींसा होऊं लागला, नि बाळासाहेब आपला स्वभाव प्रकट करूं लागले.

एके दिवशीं जेवायला बसलेले असतांच बाळासाहेब म्हणाले, " ही कारटीच मुळीं पायगुणी आहे. मी आईला त्याचवेळीं सांगत होतों, कीं असल्या दळभद्र्या कारटीला तूं आपली म्हणूं नकोस. हिच्या पाय-गुणानंच आज आमची आई गमावली. "

साहेबं कांहीं बोलले नाहींत पण माझ्या मनावर त्या भाषणाचा परि-णाम झाला. दुसरा घास माझ्या तोंडीं जाईना म्हणून तशीच उठलें. साहेबांच्या तें ध्यानीं आलं असावं असं वाटतं, कारण थोड्या वेळानं तेही अर्ध्याच जेवणावरून उठले. मागीलदारच्या नळाजवळ मी हुंदके टाकून रडत होतें तिथं येऊन ते मला म्हणाले, " उगी, उगी, पोरी, रडूं नकोस, झाल्या गेल्या गोष्टी कांहीं फिरून येत नाहींत. बाळा-साहेबांचं बोलणं कांहीं मनावर घेऊं नकोस. "

त्यांच्या बोलण्यानं मला समाधान वाटलं नाहीं, कारण तें त्यांचं भाषण अगदीं रूक्ष होतं. त्यांत मायेचा ओलावा यत्किंचितही नव्हता.

माझा सारा उत्साह नाहींसा झाला. बाईसाहेबांनीं दिलेले कपडे टाकून द्यावे आणि पुन्हा आपला जुना खणाचा चोळी परकर नेसावा असं पुन्हा पुन्हा माझ्या मनांत येई. पूर्वीच्या व्यवस्थेंत कांहीं फरक झाला नव्हता. मी शाळेंत जात होतें, मास्तर शिकवायला घरीं येत होते. पण फिरायला जाणं मात्र बंद झालं होतं. साहेब रोज फिरायला जात असत पण त्यांनीं जातांना केव्हांही मला हांक मारली नाहीं नि मीही त्यांच्या बरोबर जाण्याची इच्छा कधीं दर्शविली नाहीं.

असेच आणखी कांहीं दिवस गेले. मला असं दिसून आलं, कीं आई दुपारच्या वेळीं कुठं तरी बाहेर जाते. ती कुठं जात असे तें मला कांहीं सांगून जात नसे. नि मला सांगणार तरी काय ? तिनं कांहीं सांगितलं तरी तें कळण्याची पात्रता माझ्या अंगीं होती कुठं ?

एके दिवशीं रात्रीं मी माझ्या आईच्या कुशीला झोंपी गेलें होतें. मी दचकून जागी झालें. कांहींतरी आवाज झाल्यासारखा वाटला म्हणून मी आजूबाजूला पाहिलं, तों आई बिछान्यावर नव्हती. एक क्षणभरानं येऊन ती बिछान्यावर पुन्हां झोंपी गेली. काय झालं म्हणून विचारावं असं माझ्या मनांत आलं होतं; पण विचारण्याचा धीर मला झाला नाहीं. आवाज झाला तो कुणीतरी कुणाला तरी मारलं असावं, रपाटा लगावला असावा, अशा प्रकारचा झाला. माझ्यापरीनं मी कल्पना करून पाहात होतें; पण मला उलगडा होईना. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी जागी झालें तों सामानसुमान बांधून जाण्याची तयारी झाली होती.

ती मला 'चल' म्हणून म्हणाली नि आम्ही जायला निघालों. एक गाडी आणली होती. तींत, आमचं बरेच दिवस बाहेर लोळत पडलेलं सामान भरलं होतं. मी बाहेर आलें नि गाडींत बसलें. गडी माणसांनीं विचारलं पण साहेब किंवा त्यांचीं मुलं यांनीं कुणीच कांहीं चौकशी केली नाहीं. कदाचित् मी जागी होण्याच्या पूर्वीच त्यांचं कांहीं बोलणं झालं असलं तर तें मला कळलं नाहीं.

आम्हीं तिथून निघालों त्यावेळीं मला कळलं, कीं आम्हीं मलबार हिलवर राहात होतों आणि आतां गिरगावांत जात होतों.

गिरगांवांत आम्हाला राहण्यासाठीं एक स्वतंत्र जागा घेतलेली होती. मी पाहिलं तों ती जागा बरीच मोठी होती. इनमिन दोन माणसं आम्हीं राहणार आणि एव्हढी मोठी जागा कशाला घेतली हें मला कळेना.

आमचं बिऱ्हाड थाटलं गेलं. शाळेंत जाणं बंद झाल्यामुळं मला चुकल्या चुकल्यासारखं वाटत असे. मधून मधून बाईसाहेबांची आठवण होऊन रडूं येत असे. पण मला रडूं येतं हें मी आईला दिसूं दिलं नाहीं.

आई दररोज दुपारीं कुठं तरी जात असे आणि रोज कांहीं ना कांहीं सामान घेऊन येत असे. मोठीं मोठीं भांडीं, पाट, ताटें, वाट्या आण-ण्याचा तिनें सारखा तडाखा लावला होता. माझ्यापरीनं मी कल्पना

चालवून पाहिली, त्यावेळीं मला वाटलं, कीं खाणावळ काढायचा आईचा बेत असावा. आई कांहीं सांगत नाहीं म्हणून मीही विचारलं नाहीं. पण एके दिवशीं जेव्हां दारावर 'ब्राह्मणाची खाणावळ' म्हणून पाटी लावली गेली. त्यावेळीं साऱ्या गोष्टींचा आपोआप उलगडा झाला.

सुरवाती-सुरवातीला आई स्वतः जेवण करीत असे, पण पुढं दोन आचारी ठेवण्यांत आले. वाढायचं काम आई आणखी आचारी मिळू-नच करीत असत. पण हळूहळू माणसं वाढूं लागलीं आणि आचारी आणि वाढपी यांचीही संख्या वाढूं लागली.

याच सुमाराला मी पुन्हां शाळेंत जाऊं लागलें होतें. पण ही शाळा माझ्या पूर्वीच्या शाळेच्या मानानं मला अगदीं दरिद्री वाटे. मी पूर्वी ज्या शाळेंत जात असें तिथलीं मुलंही चांगल्या श्रीमंतांचीं असत. पण या शाळेंतलीं मुलं अगदीं माझ्यासारखींच होतीं. म्हणजे अगदींच दरिद्री होतीं असं नाहीं; पण पूर्वीं ज्या प्रकारचीं मुलं मी पाहात होतें त्यापेक्षां हीं मुलं कमी दर्जाचीं आहेत असं वाटे. त्यांच्या चालचलणुकींतही कांहीं तरी फरक होता.

मास्तर देखील तसेच होते. पोषाखापासूनही पूर्वीच्या मास्तरांत आणि यांच्यांत फरक होता—शिकवण्याच्या बाबतींतही फरक होता. पूर्वींचे मास्तर मुलांना वागवतांना अदबीनं वागवीत असत. पण हे मास्तर, बाळासाहेब जसे पदोपदीं निष्कारण माझ्यावर ओरडत असत, तसेच साऱ्या मुलांवर हुकमत चालवीत असत. आमचा जीव नकोसा करून टाकीत असत.

त्या शाळेचा मला तिटकारा आला. त्याला आणखीही कारणं होतीं. बाईसाहेबांनीं दिलेले कपडे मी अजून टाकले नव्हते नि मी ज्या प्रकारचे कपडे घालीत होतें त्या प्रकारचे कपडे घालणारीं मुलं त्या शाळेंत क्वचितच होतीं—किंबहुना नव्हतीं म्हटलं तरी चालेल. सारीं मुलं पोषाखावरून माझी थट्टा करीत असत.

आमचे एक मास्तर आमच्या खाणावळींत जेवायला येत असत. त्यांनीं ही हकीकत ज्यावेळीं आईला सांगितली त्यावेळीं माझा पोषाख पूर्वस्थितीवर न्यावा असं आईला वाटलं. पण रेशमी झग्यांची मला इतकी संवय झाली होती, कीं मी ज्यावेळीं पूर्वीप्रमाणें खणाची परकर-चोळी घालायचा प्रयत्न करूं लागलें त्यावेळीं ती अंगावर घालणं देखील मला दुःसह झालं.

आईलाही वाटलं, कशाला पोषाखांत बदल करा ? ती म्हणाली, " देवाच्या दयेनं चार पैसे मिळत आहेत. बाईसाहेबांनी जी संवय लावली आहे ती चालू ठेवण्याची अनुकूलता असतां पोरीला उगीच दळिद्रांत कशाला वागवूं ? "

मला आनंद झाला. खणाच्या चोळी परकरावर जाणं मला मनापासून पसंत नव्हतं. या शाळेंत इतर मुलींपेक्षां मी खुलून दिसत होतें. मी शाळेंत येऊं लागलें म्हणजे सारे मुलगे, मुली माझ्याकडे टक लावून पाहात असत. कुणाच्या पायांत चपला असत तर कुणीं अनवाणींच येत असत—पण मी बूट खडखड वाजवीत येऊं लागलें म्हणजे माझा मलाच एक प्रकारचा अभिमान वाटे.

पोषाखानं दिखील मला मोठेपणा आला होता. खाणावळबाईची मुलगी म्हणून बाकीचीं मुलं जरी माझी थट्टा करीत तरी मास्तरांची माझ्याशीं असलेली वागणूक इतर मुलांपेक्षां निराळ्या प्रकारची असे. एक दिवस मास्तरांनीं अगदीं भर वर्गांत सांगितलं. ते म्हणाले, "मुलांनो, खाणावळबाईची मुलगी म्हणून या मुलीची तुम्ही चेष्टा करतां हें चांगलं नाहीं. कुणाचं भाग्य कसं उज्वल होत असतं हें सांगून सांगतां येत नाहीं. खाणावळ म्हणजे कांहीं कमी नव्हे. एव्हढा मोठा कोट्याधीश टाटा, त्यानं अपोलो बंदरावर एक मोठी खाणावळ घातली आहे—तिला **ताजमहाल हॉटेल** असं म्हणतात. हॉटेल म्हटलं म्हणजे तें आपल्याला मोठं वाटतं, पण ती खाणावळच आहे. कुणी सांगावं, उद्यां

ही मुलगी 'टाटाच्या खाणावळी'सारखी प्रचंड खाणावळ या गिरगांवांत उभी करणार नाहीं म्हणून ! म्युनिसिपालिटीच्या दिव्याखालीं अभ्यास करणारीं मुलं देखील मोठ्या नांवलौकिकाला चढलीं आहेत—हायकोर्टाचे जज्जसुद्धां झालीं आहेत—"

मास्तरांच्या या बोलण्याचा सुपरिणाम व्हायच्या ऐवजीं उलट दुष्परिणामच झाला. मुलं मला 'वेणू टाटा' म्हणूं लागलीं आणि आमच्या दारावरून जातांना 'ही पाहा टाटाची खाणावळ' म्हणून आमच्या दारांतील पाटीकडे बोट करून मला वांकुल्या दाखवूं लागलीं.

थट्टेनं माणसाला राग येतो खरा. पण कांहीं कांहीं थट्टा अशा असतात, कीं त्यामुळं राग येण्याऐवजीं अभिमानच वाटतो. टाटाच्या हॉटेलची जी कल्पना मास्तरनीं सांगितली ती माझ्या डोक्यांत भिनली होती. पुढल्या काळांत आपण आईचा हाच धंदा पुढं चालवायचा आणि टाटाच्या हॉटेलसारखं मोठं हॉटेल काढून, आज थट्टा करणाऱ्या साऱ्या मुलांना तिथं फुकट जेऊं घालायचं, असा मी मनाशीं निश्चय केला.

ही शाळेंतली हकीकत मास्तरांनीं आईला सांगितली, त्यावेळीं आईला आनंद झाला. मास्तर एवढ्या कळकळीनें आपल्या मुलीची काळजी घेतात हें पाहिल्यामुळं तीही त्यांच्याबद्दल आदर बाळगूं लागली. इतर जेवणारांपेक्षां मास्तरांची काळजी जास्त घेतली जाऊं लागली.

मास्तरांनाही तेंच हवं होतं, नि तेवढ्यासाठींच त्यांनीं बुद्धिपुरस्सर ही हकीकत माझ्या आईला सांगितली होती.

जसजसा आमच्या खाणावळीचा पसारा वाढत होता तसतसा आईच्या स्वभावांतही पालट होत चालला होता. पूर्वी ती एक शब्दसुद्धां बोलत नसे. तीन वेळां प्रश्न करावा तर एकदां उत्तर देत असे. तीच माझी आई आतां तासचे तास एकेका माणसाबरोबर हुज्जत घालीत बसलेली पाहून मला आश्चर्य वाटे. आईच्या स्वभावांत पायरीपायरीनं होत असलेला फरक व्हायचं कारण काय, याचा मी आपल्या मनाशीं विचार करूं लागलें.

साहेबांच्या घरीं आम्हीं होतों त्यावेळीं पुरुष मंडळींच्या बाजूला-सुद्धां ती फिरकत नसे—वाढण्याकरितां काय बाहेर येईल तेव्हढीच—तीच माझी आई आतां चांगल्या मोठमोठ्या माणसांबरोबर जगाच्या व्यवहाराच्या गोष्टी ज्या वेळीं बोलूं लागे त्यावेळीं ऐकणारे जितके थक्क होऊन जात त्यापेक्षां माझ्या मनावर जास्त परिणाम होत असे.

तो चळवळीचा काल होता. वर्तमानपत्रांतल्या होमरूलच्या चळव-ळीच्या हकीकती पंगतीवर रोज सारख्या सुरू असत. कुणी काय केलं, कुठं कोणतं व्याख्यान झालं, आज वर्तमानपत्रांत काय आलं आहे, या सर्वांचा पाढा वाचण्यास प्रत्येक जेवणकऱ्याला खाणावळ ही एकच आवडती जागा असे.

पंगतीवर निरनिराळ्या पक्षांच्या मंडळींचीं जी आपसांत भाडणं होत तीं मी लक्षपूर्वक ऐकत असें. त्या लोकांचे निरनिराळे गट होते. कुणी जहाल होते, कुणीं मवाळ होते—नि दोघांची थट्टा करणारा जो एक तिसरा वर्ग होता त्याला हे जहाल आणि मवाळ 'टवाळ' अशी संज्ञा देत असत. जहालांची आाण मवाळांची चर्चा प्रसंगाला इतकी हात घाईवर येत असे, कीं जेवणं अर्धी टाकून ते आतां मारामारी करतील की काय, असं दिखील पाहाणाराला वाटूं लागे. इतक्या कळकळीनं ही चर्चा चालूं लागली म्हणजे मला असा प्रश्न पडे, कीं ही मंडळी इथं जेवायला येतात, कीं भांडणं करा-यला येतात !

वस्तुस्थिति जरी अशी होती तरी त्या चर्चेंत माझं मन रमत असे. त्यांच्या भाषणांचा विषय हळूहळू मला कळूं लागला नि त्यामुळं वर्तमानपत्रं वाचण्याची मला चटक लागली. माझं तें वय वर्तमानपत्रं वाचून समजण्याइतकं नव्हतं. पण वर्तमानपत्रांतल्या विषयांची जी चर्चा इतक्या प्रशस्तपणानं ऐकूं येत असे तीमुळं वर्तमानपत्रांतला विषय मला सहज आकलन करण्याला कठीण जात नसे. दुसऱ्यांच्या चर्चेच्या अनु-

रोधानं जरी मी वर्तमानपत्रांकडे पाहात असें, तरीही हळूहळू मला स्वतंत्र विचार करण्याची संवय होऊं लागली. त्याचा परिणाम असा झाला, कीं पंगतीवर होणाऱ्या चर्चा सुरू झाल्या म्हणजे मीही त्यांत तोंड घालूं लागलें.

पहिल्या पहिल्यानें ती मंडळी माझ्याकडे दुर्लक्ष करीत असत. पण हळूहळू थट्टा करतां करतां असं होऊं लागलं, कीं माझ्याही प्रश्नांना त्यांच्या चर्चेतून उत्तरं मिळूं लागलीं. या प्रकारामुळं माझा आत्मविश्वास बळावत चालला नि मी अशा चर्चांतून प्रामुख्यानं भाग घेऊं लागलें.

मला आश्चर्य वाटे तें हेंच, कीं आईसुद्धां या चर्चांतून सहज कानांवर पडतील ते शब्द पकडून मधें तोंड घालीत असे. त्यांत तिचं विशेष लक्ष असे असं नाहीं. परंतु जेवायला येणाऱ्या मंडळींत आपुलकी उत्पन्न होण्यासाठीं त्यांच्या सुखदुःखाच्या गोष्टींत ती भाग घेत असे, असं ती मला सांगे.

हळूहळू आमच्या खाणावळीची इतकी प्रगति होऊं लागली, कीं आमच्या खाणावळींत येणं हा एक प्रकारचा मान समजला जाऊं लागला.

## प्रकरण ५

## मी मालकीण होतें

अशा रितीनं बराच काळ गेला. सांपत्तिक दृष्टया आमची स्थिति चांगलीच सुधारली होती. आम्हीं श्रीमंतांत मोडूं लागलों होतों. दारिद्र्याची आठवण देखील आतां उरली नव्हती.

बाईसाहेबांनीं ज्या प्रकारची शिस्त मला लावली होती, ती शिस्त न मोडतां माझं पुढलं आयुष्य त्या एकाच चाकोरींतून चालू राहिलं होतं.

हल्लीं मी ज्या शाळेंत जात होतें त्या शाळेंत महाराष्ट्रीय मंडळी फारच थोडी असत. जी कांहीं होती ती आमच्यापेक्षां श्रीमंतीच्या दृष्टीनं वरच्या दर्जाची होती. त्या मुलांना पोंचवण्यासाठीं मोटारी येत असत. मला उणीव वाटे ती हीच, कीं आपल्याला पोंचवायला दिखील मोटार आली पाहिजे.

ती उणीव भरून येणं अशक्य नव्हतं, पण मोटार घ्यायची कशा-साठीं ? मी शाळेंत जाण्यापलिकडे मोटारीचा दुसरा कोणताही उपयोग नव्हता. म्हणून इच्छा असतां आणि अनुकूलता असतांही, आईनं केवळ माझ्यासाठीं म्हणून मोटार घेण्याचं टाळलं.

एक दिवस आमच्या गांवचे नाझर अचानक येऊन दाखल झाले. ते आतां नोकरीवर नव्हते. त्यांनीं पेनशन् घेतलं होतं. हायकोर्टांत कांहीं काम असल्यामुळं ते मुद्दाम मुंबईला आले होते. आईच्या खाणा-वळीची हकीकत गांवापर्यंत जाऊन पोचली होती. अर्थातच ते उतर-

ण्यासाठीं आमच्याकडे आले होते. आमच्या खाणावळींत उतरण्याची व्यवस्था नव्हती—तरी जुन्या ओळखीला अनुसरून आईनं मुद्दाम त्यांच्यासाठीं स्वतंत्र व्यवस्था करून दिली होती.

मला पाहतांच ते म्हणाले, "वेणे, कारटे, बरीच मोठी झालीस कीं! आणि अगदीं मड्डम बनलीस! कोंकणांत गेलीस तर तुला किरिस्ता-नाची मुलगी म्हणतील. आपण ब्राह्मण लोक आहोंत. हें असलं कांहीं बरं नाहीं. आतां या तुमच्या मुंबईत सारं कांहीं चालतं म्हणा—पण आमच्या डोळ्यांना कांहीं हें चांगलं दिसत नाहीं."

आई म्हणाली, "देश तसा वेश आणि गुरु तसा उपदेश. मी खाणावळवाली म्हणून लोक मला कमी लेखतात. पैसा असला तरी चार मंडळींत माझा दर्जा कमी समजला जातो. आम्हां लोकांचं हें असं आहे. नोकरीला मान आहे तो धंद्याला नाहीं. त्यांतून मी बायको माणूस, स्वतंत्र रितीनं धंदा करतें, खाणावळीचा धंदा करतें, म्हणून कुटुंबांतलीं चार माणसं मला बोलावीत सुद्धां नाहींत. माझ्यावर एक प्रकारचा बहिष्कारच या लोकांनीं टाकला आहे म्हणाना! तेव्हां आपलीं माणसं आपल्याला ओळखत नाहींत मग त्यांची भीड तरी कशाला धरायची? मुलीला जर दर्जा आला तर उद्यां ती आपलं बस्तान चांगलं बसवील. ज्या इंजिनियरसाहेबांकडे मी सैपाकीण होतें त्यांचीं मुलं ज्या शाळेंत जात असत, तसल्याच शाळेंत हिला घातली. तुम्हीं ऐकलं नाहीं? फाडफाड इंग्रजी बोलते! दाखवा बरं तुमच्या कोंकणचीं असलीं माणसं! चार बुकं कांहीं पुरतीं येत नाहींत. त्या शाळेंतल्या मास्तरांना आणून उभं करा आमच्या वेणू समोर आणि मग ऐका ती कसं काय बोलते ती—"

तोंड फाटेपर्यंत आई माझी स्तुती करीत होती. आईनं केलेली माझी ही स्तुती मी पहिल्यानंच ऐकली. गांवचे गृहस्थ आले आहेत म्हणून ती त्यांच्याकडे आपला बडेजाव मिरवीत होती. एव्हढं खरं, कीं त्या स्तुतीनं मी फुगून गेलें. मला वाटलं, कीं त्या खेडवळ माणसांपेक्षां

मी कुणीतरी चांगलीच मोठी आहें. त्या खेडवळ माणसांच्या आठवणी पुसट पुसट झाल्या होत्या. स्वप्नासारखी एक अंधुक अंधुक कल्पना नजरेसमोर येत असे. पण त्यानं गांवची माणसं कोणत्या प्रकारचीं आहेत याचं स्पष्ट चित्र मला काढतां आलं नसतं.

आमची सुस्थिती पाहून नाझरांना फार आनंद झाला. मनाला वाटेल तें स्पष्ट बोलून दाखवण्याची त्यांची वृत्ती होती. ते म्हणाले, " असं पाहा सत्यभामाबाई, आजचा काळ असा आहे, चार पैसे ज्याच्याजवळ असतील तीं माणसं या जगांत मोठीं ठरतात. तुम्ही धंदा खाणावळीचा करतां कीं चांभाराचा करतां, हें कुणीं पाहाणार नाहीं. तुमच्या स्वतःच्या मालकीचा बंगला नाहीं, तरी तो झालेला पाहिला, कीं उद्यां कोंकणांत गेल्यावर सारे लोक तुम्हाला डोक्यावर घेऊन नाचवतील. पाठीमागून निंदा करायला चुकायचे नाहींत—ती आम्हा लोकांची वृत्तीच आहे. तेव्हां एकंदरींत पाहातां चार पैसे तुमच्याजवळ असले तर ते तुमचा बडेजाव केल्याशिवाय राहाणार नाहींत. आणि त्या दृष्टीनं पाहिलं म्हणजे बाकीच्या गोष्टींकडे डोळेझांक करावी असंच मला वाटतं. "

नाझरांच्या बोलण्यामुळं मला काय वाटलं त्याची कल्पना मला आज देतां येणार नाहीं. तो आत्मविश्वास होता, कीं अभिमानाची लहर होती, हें सांगतां येत नाहीं. पण एव्हढं मात्र खरं, कीं माझं अंतःकरण फुलून गेलं. जुन्या ओळखीचा एक माणूस येऊन त्यानं आपल्याबद्दल चार चांगले शब्द काढले, अशी गोष्ट पहिल्यानंच झाल्यामुळं माझ्याप्रमाणं माझ्या आईलाही बरं वाटलं.

बाईसाहेबांच्या मृत्यूनंतर जरी त्या घराचा आणि आमचा संबंध सुटला होता तरी मला पुन्हां पुन्हां त्यांची आठवण आल्यावांचून राहात नसे. एकदां जाऊन आपलें वैभव साहेबांच्या मुलांसमोर मिरवून यावं अशी लहर पदोपदीं मला येई. आईला मी तें बोलून दाखवलं नव्हतं.

त्यांचं घर कोणत्या बाजूला होतं याची मला कल्पना नव्हती. बोलतां बोलतां सहज आईकडून मी त्यांचा पत्ता काढून घेतला नि एक दिवशीं भाड्याची मोटार करून त्या बाजूला गेलें.

माझी निराशा झाली. ती मंडळी तिथून निघून गेली होती आणि ती दुसऱ्या कुठं रहायला गेली याचाही तिथं राहायला आलेल्या लोकांना पत्ता नव्हता.

माझी खेप फुकट गेली, तसंच मोटारीचं भाडंही फुकट गेलं. माझ्या निराशेची ही हकीकत मी आईला सांगितली नाहीं.

काय वाटेल तें करून या मंडळीचा पत्ता लावायचा असा मी निश्चय केला होता. खाणावळींत येणाऱ्या मंडळींपैकीं पुष्कळ मंडळी माझ्या चांगली ओळखीची झाली होती. त्यांच्याकडून त्यांचा पत्ता काढण्याचा मी प्रयत्न केला. पण मुंबईच्या अफाट सिंधूतला तो लहानसा बिंदू मला सांपडून मिळणं शक्य नव्हतं.

अंतःकरणाला तळमळ लागली होती पण तिचा चरितार्थ होत नव्हता.

श्रीमंतींतच जरी आज आमचे दिवस जात होते तरी गरिबीची आठवण जाऊं नये म्हणून आई केव्हां केव्हां मला कामाला लावीत असे. रविवारच्या दिवशीं जेवणांत कांहीं तरी थाटाचा बेत होत असे. एकादं पक्वान्न असे. पंगतीवर तें पक्वान्न वाढण्याचं काम माझ्याकडे असे. एकाद्या रविवारीं पक्वान्न वाढायला जर मी न आलें, तर जेवणारी मंडळी एकच गिल्ला करीत.

हें वाढण्याचं काम करीत असतांना मला अभिमान वाटे. पण वाढण्याची गडबड चालू असतांना जेवणारी मंडळी जी काव काव करीत, त्यानं माझा जीव गांजून गेल्यासारखा होई. मुद्दाम मला त्रास द्यावा अशी कुणाची इच्छा नसे. पण सतावून सोडण्यांत मात्र येत असे एवढं खरं. तें सतावणं कौतुकाचं होतं.

पूर्वीची आठवण झाली म्हणजे मला या वाढण्याचं केव्हां केव्हां वाईट वाटे. नोकरासारखं मी काम करावं म्हणून बाळासाहेब ज्या वेळीं हट्ट धरीत असत त्या वेळीं बाईसाहेब त्यांना मना करीत. म्हणून असलं हें काम करणं कमी दर्जाचं आहे अशी त्या श्रीमंतांच्या घरांत असतांना माझी कल्पना करुन दिली गेली होती. नोकर असतांना देखील—म्हणजे माझी आई नोकर असतांना—तीं कामं मी केलीं तर माझ्या दर्जात जर बिघाड होत असे, तर आतांच हें असं कां वाटावं ?

पुन्हां मला आठवण येई, ज्या दिवशीं घरीं कांहींतरी समारंभ असे त्या दिवशीं अन्नशुद्धि वाढायचं किंवा पक्वान्न वाढायचं काम बाईसाहेब स्वतः करीत असत. त्यांना तो कमीपणा वाटत नव्हता. जें काम मालकिणीनं केलं म्हणजे कमदर्जाचं ठरत नाहीं, तेंच काम नोकराकडून सक्तीनं करून घेतलं म्हणजे कमदर्जाचं कां ठरावं, याची मीमांसा मला करतां येत नव्हती.

आजही तसंच होत होतं. मालकिणीची मुलगी म्हणून मालक, या नात्यानं मी वाढण्याचं काम करीत होतें आणि म्हणूनच सारीं माणसं माझं कौतुक करीत असत. तेंच काम वाढपी करीत होते त्यांचं कौतुक कधीं कुणीं केलं नाहीं. त्यांची चूक झाली तर सारी मंडळी त्यांच्या अंगावर ओरडे. त्यांच्याविरुद्ध तक्रारी करी. पण मी जरी वाढण्यांत चुकलें, हयगय केली, उशीर लावला, तरी माझ्याबद्दल प्रत्येक जण दया दाखवी. नव्हे—दुसरं कुणी घाई करीत असलं तर त्याला ते म्हणत, "अरे एव्हढीशी ती पोर–तुम्हां एव्हढ्या मंडळींना वाढते आहे, तर तिला शाबासकी द्यायच्याऐवजीं असं अंगावर काय वसवस ओरडतां ?"

वाढप्यांत देखील माझ्या एव्हढाच एक मुलगा होता. तोही नव्हता का वाढीत ? मग त्याच्याबद्दल दया कां दाखवली जात नसे ?

हें कोडं मला कधींच उलगडलं नाहीं.

नाझर बरेच दिवस मुंबईला राहिले होते. सर्व मंडळी घरच्या

एकाद्या वडील माणसासारखी त्यांना लेखीत असत. तेही आमच्या-बद्दल नात्याच्या माणसाची जेवढी काळजी घ्यावी तेवढीच घेत असत, तितकंच कोडकौतुक करीत असत. माझ्याशीं ते बोलूं लागले, कीं आईच्या तारिफेशिवाय दुसरी कोणतीच भाषा त्यांच्या तोंडून निघत नसे आईनं काय कर्तबगारी दाखवली होती याची पूर्ण कल्पना मला नव्हती.

पण एके दिवशीं आई त्यांना जेव्हां मागल्या सगळ्या गोष्टी सांगूं लागली, तेव्हां कांहीं कांहीं बाबींवर चांगलाच प्रकाश पडला. मुंबईबाहेरून पोट भरण्यासाठीं मुंबईत आलेल्या एका बाईला एवढी मोठी खाणावळ चालू करणं कधींच शक्य झालं नसतं. जवळ जवळ दोन वर्षे माझी आई साहेबांच्या घरीं सैपाकीण म्हणून राहिली होती. त्या वेळचा सारा पगार जरी तिनं साठवून ठेवला असता तरी तिला खाणावळ उघडण्याइतकं भांडवल मिळणं शक्य नव्हतं. तें जें शक्य झालं तें त्या माउलीच्या कृपेमुळं. बाईसाहेबांची स्वतःची अशी कांहीं पुंजी म्हणून होती. त्यांतले एक हजार रुपये त्यांनीं मरण्यापूर्वीं माझ्या आईकडे 'माझ्यासाठीं' देणगी म्हणून दिले होते. त्याच भांडवलावर तिला ही खाणावळ उघडतां आली.

ही हकीकत ऐकली त्यावेळीं नाझरांना फार वाईट वाटलं. ते म्हणाले, "कुठली कोण बाई, नात्यागोत्याची तर नव्हतीच नव्हती—मालकिणी म्हटल्या म्हणजे घरच्या नोकरांचा छळ करतात—तर उलट या बाईनं कुणाला न कळत गुपचुप एवढी मोठी हजार रुपयांची रक्कम दिली, हें खरोखरच मोठं आश्चर्य आहे!"

आई म्हणाली, "ती रक्कम त्यांनीं 'मला' दिली नाहीं—वेणूला दिली. आणि खरं पाहिलं तर ही खाणावळ वेणूची आहे—माझी नव्हे. तिचे पैसे मी वापरले आहेत आणि म्हणूनच या खाणावळीबद्दल मला फार काळजी वाटते. खऱ्या हिशेबीं पाहिलं, तर इथं मी नुसती व्यवस्थापक

आहे. ही उद्यां मोठी झाली म्हणजे हिचा धंदा हिच्या ताब्यांत देऊन, आई म्हणून हिनं मला चार घास घातले तर खाऊन, मुकाट्यानं स्वस्थ राहीन—किंवा तिची नोकर म्हणून काम करीन. हें ब्रह्मस्व आहे. तें मला नको आहे."

मला वाईट वाटलं. ही हकीकत मी ऐकावी म्हणून आईनं ती मुद्दाम नाझरांना सांगितली. विश्वासांत घेऊन कोणतीही गोष्ट मला सांगायची आईची संवयच नव्हती म्हणूनच तिनं ही संधी साधली.

मला त्यावेळीं काय वाटलं हें मला सांगतां यायचं नाहीं; पण एक प्रकारचा अभिमान वाटला खरा. बाईसाहेबांची आठवण होऊन माझं हृदय भरून आलं. त्यांनीं मला आपली मुलगी म्हटलं होतं तें वचन शेवटपर्यंत सार्थ केलं.—

हे विचार माझ्या अंतःकरणांतून वावरत आहेत तोंच आई माझ्याकडे वळून म्हणाली, "आणि हें पहा वेणू, हें बोलायचं नाहीं बरं कुणासमोर. हें एक गुपित आहे. बाईसाहेबांनी मला शपथ घातली आहे. त्यांच्या घरांतल्या माणसांना जर ही हकीकत कळली, तर बिचारी ती माउली आज मरून गेली आहे, तरी तिला शिव्या देतील."

आईचं म्हणणं मला पटलं. तरी त्यावेळीं माझ्या पोरबुद्धीला असं वाटलं, 'कोण जातं आहे साहेबांना सांगायला ?' नि ते मुंबईत आहेत कीं नाहींत याचा तरी कुठं पत्ता होता ?—

पुन्हां असं वाटलं. हें सांगायचं तरी कुणाला ? असं कोण जिवाभावाचं माझं माणूस होतं, कीं त्याच्याकडे मी सांगणार होतें ? कुणाला तरी सांगावं असं मला वाटत होतं खरं. या खाणावळीची मालकीण मी आहे, या वस्तुस्थितीचा मला अभिमान वाटला. कुणाजवळ तरी ती मालकी मिरवावी म्हणून मला उत्कंठा लागली. मग सांगायचं कुणाजवळ ?—पण लगेच आठवण झाली, कीं बाईसाहेबांनीं शपथ घातली आहे. त्यांनीं शपथ घातली असतां ही हकीकत सांगणं कांहीं

बरोबर होणार नाहीं. उद्यां मी मोठी झालें—म्हणजे सर्वांना कळणारच आहे—मग आजच कशाला घाई ?

तात्पुरतं का होईना, पण त्या वेळीं मी माझ्या मनाचं समाधान करून घेतलं; पण त्या दिवशीं माझ्या स्वभावावर जो एक प्रकारचा परिणाम झाला, तो मात्र नाहींसा झाला नाहीं. या खाणावळीची मालक मी आहें—आई मालकीण म्हणून मिरवते आहे—पण ती खरी मालकीण नव्हे, नुसती माझ्या वतीनें व्यवस्था पाहाते आहे—या जाणिवेनं माझं अंतःकरण एक प्रकारें फुलून गेलं होतं. आई इतकं माझं कोडकौतुक कां पुरवते, माझ्या कपड्या-लत्याकडे एव्हढ्या काळजीनं कां लक्ष देते, म्युनिसिपालटीच्या भिकार शाळेंतून काढून तिनं मला बड्या लोकांच्या व्यवस्थेनं चालवलेल्या शाळेंत कां घातलं, याचा सारा उलगडा मला झाला. या ज्या कांहीं गोष्टी घडत होत्या त्या आईच्या इच्छेनं नव्हत्या; ही जाणीव मला ज्यावेळीं झाली त्या वेळीं आईच्या प्रेमाचा धागा माझ्या अंतःकरणांतून तुटून गेला. माझी जन्मदात्री आई जरी ही असली, तरी जीवनदात्री आई म्हणजे बाईसाहेबच, हें माझ्या अंतःकरणांत कायमचं ठिबून राहिलं.

आईबद्दलचा माझा आदर या विचारपरंपरेनं कमी झाला, असं मात्र नव्हे. पण या पूर्वींचा माझा आईबद्दलचा जो लळा होता, माझ्यासाठीं मुद्दाम ती मला एव्हढ्या श्रीमंती थाटांत ठेवते, हें समजल्यामुळं उत्पन्न झालेला जो अभिमान होता, तो संपला.

माझ्या आयुष्याला इथून एक प्रकारें नवीन वळण लागलं.

# प्रकरण ६

## मी मिजासखोर झालें

त्या दिवसापासून माझा नित्याचा स्वभाव बदलला. या एवढ्या मोठ्या पसाऱ्याची मालकीण मी आहें, हें वाटूं लागल्यामुळं माझ्या चालचलणुकींतही फरक झाला. तो फरक नोकरचाकर नि जेवायला येणारे लोक यांनाही जाणवूं लागल्यामुळं ते तसं बोलूनही दाखवूं लागले. एक बँकेतले कारकून मोठे बोलघेवडे असत. खाणावळींत पाऊल टाकल्यापासून परत जाईपर्यंत त्यांच्या तोंडाचा नगारा सारखा वाजत राहिलेला असे. त्यांची येण्याची वेळही ठराविक होती. त्यामुळं त्यांच्या येण्यावरून बाकीचे लोक आपल्या टाइमाचा अंदाज घेत असत. ते आले म्हणजे, 'आली नवाची गाडी' असा सर्वांच्या तोंडून उद्गार येई.

त्यांच्या बोलण्यावरून माझ्या वृत्तींत फरक झाल्याची मला खात्री पटली. एक दिवस ते म्हणाले, "हल्ली तुमची मिजास फार वाढली आहे वेणूताई! मला वाटतं, शाळेंत तुमचा नंबर वर गेला असावा, कांहीं बक्षीस मिळालं असावं किंवा एकादी स्कॉलरशिप मिळाली असावी! काय, झालं काय तुम्हांला? सांगाल कीं नाहीं?"

मी विचारलं, "मिजास वाढली आहे म्हणजे झालं आहे काय?"

त्यांनीं उत्तर दिलं, "तें तसं कांहीं सांगतां यायचं नाहीं. म्हणजे अमुक एक फरक झाला आहे असं कांहीं टिचून सांगतां यायचं नाहीं, पण फरक झाला आहे यांत मात्र शंका नाहीं. जरा भाषण थोडंसं करारी

येतं. नोकरांना हुकूम करण्यांत जरा जरब जास्त वाटते. आम्हां लोकांची चौकशी करण्यांत देखील मोठेपणा आणल्याचा वास येतो. असे किरकोळ किरकोळ फरक आहेत; पण ते माझ्यासारख्याच्याच नजरेला दिसतात. नाणीं बारकाईनं पाहायची सवय आहे कीं नाहीं मला बँकेंत. तिथं बारिकसारिक नाण्यांतले बारिक सारीक दोष जसे मला चट्कन दिसून येतात, तशीं या मुंबईच्या बँकेच्या वातावरणांतलीं चालतीं बोलतीं नाणीं देखील मी चट्कन पारखूं शकतों. "

त्यांची पारख बरोबर होती यांत शंका नाहीं. त्यांनीं दाखवून दिल्यावर का होईना, पण माझ्यांत झालेला फरक मला जाणवूं लागला. पुन्हां मूळपदावर यावं या निश्चयानं जरी वागायचा प्रयत्न मी करूं लागलें तरीही अधिकाराची जाणीव माझ्या स्वभावांतून जात नव्हती.

शाळेंतल्या बरोबरीच्या मुलीदेखील असंच म्हणत असत. हल्लीं मी ज्या शाळेंत जात होतें ती निव्वळ मुलींचीच शाळा होती. तिच्यांत बराचसा भरणा ख्रिश्चन आणि पारशी मुलींचा होता. त्यांच्या चालचलणुकीबरोबर माझीही चालचलणूक बदलली गेली असल्यामुळं इतर शाळांतलीं मुली–मुलं माझ्याकडे निराळ्या नजरेनं पाहात असत. माझ्या शाळेंतल्या शिक्षकिणी बहुतेक यूरोपियनच असल्यामुळं आमचा सारा व्यवहार इंग्रजींतच चालत असे. मराठी मुलींत माझं इंग्रजी एकंदरींत बरंच चांगलं आहे असं मास्तरणीही म्हणत. इतर शाळेंतील मुलांशीं बोलतांना, म्हणूनच, ज्यावेळीं मी इंग्रजी बोलत असें त्यावेळीं तीं थोडींशीं लाजून मराठींतच उत्तर देत. आपल्या इंग्रजींत कांहीं चुका होतील नि ही मुलगी त्या चुका काढील नि त्यामुळें आपला नि त्याबरोबरच आपल्या शाळेचा पाणउतारा होईल, या भीतीनं तीं माझ्याशीं मराठींतच बोलत असत.

पण मी इंग्रजी बोलण्याचा माझा शिरस्ता कायम ठेवला होता. मराठीकडे दुर्लक्ष करण्यांत मला अभिमान वाटे. मराठी बोलतांनादेखील

मधून मधून शक्य तितकं इंग्रजी घालून बोलण्याची मला जी संवय लागली होती ती इतर लोकांच्या दृष्टीनं जरी सदोष समजली जात असे, तरी मला मात्र त्याचा अभिमान वाटे. माझ्यामागं इतर मुली जी चर्चा करीत असत ती माझ्या कानीं येत नसे असं नाहीं. ‘ खाणावळ-वालीची मुलगी उगीच मिजास दाखवते. इंग्रजी बोलली तरी खाणा-वळवाली ती खाणावळवाली...’ असं मला ऐकूं येईल अशा रितीनं बोललं जात असे.

मी खाणावळवालीची मुलगी म्हणजे कांहींतरी कमी दर्जाची आहें, असं लोकांनीं कां समजावं हा मला मोठा प्रश्न पडे. कांहीं कारकून होते, कांहीं वकील होते, त्यांचीं जीं मुलं होतीं त्यांना धड अंगभर कप-डेही मिळत नसत, किंवा वेळीं पुस्तकंही मिळत नसत, मी सर्व दृष्टीनं सुखांत होतें—समृद्धींत होतें—मग माझ्यापेक्षां कारकून आणि वकील यांचा दर्जा जास्त कां ?

याचा उलगडा मला होत नसे. खाणावळीच्या धंद्याला लोकांनीं नांवं कां ठेवावींत, याचं उत्तर मी कुणाकडून मागितलं, तरी माझं समाधान होण्याजोगं उत्तर कुणालाच देतां येत नसे. खाणावळीच्या धंद्यांत जर इतर कोणत्याही धंद्यापेक्षां चांगले पैसे मिळतात तर खाणावळीचा धंदा कमी कां ?

पूर्वीच्या आयुष्यांत माझ्या आईनं सैपाकणीचं काम केलं असलं—आजही ती वेळप्रसंगीं सैपाक करीत असेल वाढीत असेल—तरी तिचा दर्जा इतर कुटुंबांत सैपाक करणाऱ्या आणि वाढणाऱ्या बायकांपेक्षां कमी कां ? आपापल्या घरचं जेवण ज्या बायका करतात त्या, त्या घरांपुरत्या खाणावळवाल्याच नाहींत का ? त्या बिचाऱ्यांना खाणावळवालीप्रमाणें त्या कामाचा मोबदलासुद्धां मिळत नाहीं—मग त्यांचा दर्जा मोठा कां आणि आमचा दर्जा लहान कां ? नोकरांनीं काम करणं आणि मालकानं काम करणं, यांत दर्जाच्या नि

विनयाच्या दृष्टीनं जो फरक केला जात असे तशाच प्रकारचा हाही फरक मला वाटला.

शाळेंतील जीवनांत कांहीं कांहीं मैत्रिणी जोडल्या जात होत्या. त्यांत जशा महाराष्ट्रीय होत्या तशाच पारशी आणि खिश्चनही होत्या. पण मला महाराष्ट्रीय जास्त जवळच्या वाटत असत, तें त्या मराठी बोलतात म्हणून नव्हे—तर पारशी आणि खिश्चन मुली माझ्यापेक्षां जास्त सुबुद्ध होत्या—जास्त बुद्धिमान होत्या—तशा महाराष्ट्रीय मुली नव्हत्या नि म्हणूनच माझा वरिष्ठ दर्जा त्यांच्याकडे मिरवतां येत असे—एव्हढ्या साठींच त्यांचा माझा स्नेह जुळून येत होता.

स्नेह जुळून येण्याच्या कामीं समान बुद्धि, समान वृत्ती आणि समान दर्जा यांची आवश्यकता आहे असं म्हणतात पण माझ्या बाबतींत याच्या अगदीं उलट होतं. मला ज्या मैत्रिणी पाहिजे होत्या त्यांच्याकडे मला माझा मोठेपणा मिरवतां येईल कीं नाहीं, याचा अंदाज मी आधीं घेत असें. खाणावळबाईची मुलगी म्हणून इतर मुली मला कमी लेखीत, त्यामुळंच अशाप्रकारची वृत्ती माझ्या अंगीं बाणली होती कीं काय, याची मला वरच्यावर शंका येई.

माझ्या या मैत्रिणींच्या यादींत ज्या मुलीचं अग्रस्थान होतं त्या मुलीचं नांव सुलोचना असं होतं. तिचा बाप कापड दुकानदार होता. कारकून वकिलांचीं मुलं माझ्या प्रमाणंच तिलाही कमीदर्जाच्या दृष्टींनं पाहात म्हणूनच तिचा आणि माझा जास्त लोभ जडला होता. दोघींचीही तक्रार एकाच प्रकारची होती. तिचा बाप देखील चांगला श्रीमंत होता—तिला कमी लेखणाऱ्या कारकून वकिलांना त्यानं आपल्या दुकानांत नोकर म्हणून ठेवलं असतं, इतका श्रीमंत होता. तरीही तिला लोक कमी लेखीत असत; म्हणूनच तिचीही माझ्याप्रमाणें दर्जाच्या बाबतींत तक्रार असे.

मी तिच्या घरीं जात असें त्यावेळीं तिचे वडील तिच्यापेक्षांही

माझं कौतुक करीत असत. ते देखील गरिबींतून वर चढलेले होते. तेही आमच्यासारखे ब्राह्मणच होते. त्यांनाही दुकानदारीचा धंदा करीत असल्यामुळं त्यांच्या तोलाच्या आणि बरोबरीच्या माणसांकडून कमी लेखलं जात असल्याची जाणीव होती. माझ्याबद्दल त्यांना अभिमान वाटत असे तो यामुळंच.

त्यांची मुलगी माझ्याइतकी अभिमानी नव्हती पण अभ्यासू होती. बुकांत तोंड खुपसून बसण्याची मला चीड असे. मी अभ्यास केव्हां करतें हें कुणाला कळूसुद्धां नये, याबद्दल मी खबरदारी घेत असें. ‘ सदोदित उनाडणारी ही मुलगी वर्गात वरचा नंबर पटकावते ’ असं लोकांनीं म्हटलं म्हणजे मला मोठा अभिमान वाटे नि म्हणूनच सुलोचनेच्या वडिलांना माझ्याबद्दल अभिमान वाटे.

सुलोचनेच्या वडिलांचें नांव सदाशिवराव असं होतं. सार्वजनिक चळवळींत ते प्रामुख्यानं भाग घेत असत. बहुजनसमाजाला त्यांची माहिती होती. वर्तमानपत्रांतून निरनिराळ्या सभांच्या वेळीं त्यांचीं भाषणं झाल्याचे रिपोर्ट ज्यावेळीं प्रसिद्ध झालेले मी वाचले त्या वेळीं माझ्या आईनं देखील सार्वजनिक चळवळींत असाच भाग घ्यावा, असेच वर्तमानपत्रांतून तिच्या भाषणांचे रिपोर्ट यावेत, असं मला वाटूं लागलं.

मला हें जें कांहीं वाटत असे तें मी आईकडे कधींच बोलून दाखवलं नाहीं. नि बोलून दाखवलं असतं तरी त्याचा उपयोगही झाला नसता. त्या काळांत बायका सार्वजनिक चळवळींत पडत नव्हत्या असं नाहीं; पण आपण अशा सार्वजनिक चळवळींत जाऊं लागलों तर आपली उपेक्षा केली जाईल किंवा अपमान केला जाईल, ही भीति आईला वाटत असे—आणि ती तसं बोलूनही दाखवीत असे—म्हणूनच माझी इच्छा मी तिला कधीं स्पष्टपणें बोलून दाखवली नाहीं.

सदाशिवरावांना माझ्या आईबद्दल मोठा आदर असे. अनाथ अपंग स्थितींत मुंबईसारख्या अफाट ठिकाणीं येऊन तिनं आपल्या धंद्याचा जो जम बसवला आणि जें वजन निर्माण केलं, त्याबद्दल ते तिची तोंड फाटेपर्यंत स्तुति करीत असत. कोणताही धंदा करणाऱ्या माणसाबद्दल त्यांचा फार आदर असे, तितकाच नोकरी करणाऱ्या माणसांबद्दल तिटकारा असे.

स्वतंत्र वृत्तीची त्यांना फार आवड होती. तशीच स्वतंत्र वृत्ती आपल्या मुलामुलींच्या ठिकाणीं बाणावी म्हणून ते सदोदित जिवापाड परिश्रम करीत. ते ज्या ज्या वेळीं घरीं असत त्या त्यावेळीं आपल्या मुलांना ज्या गोष्टी सांगत त्यांत स्वतंत्र बाण्यानं धंदा करून पुढं आलेल्या लोकांच्या हकीकती प्रामुख्यानं असत.

त्यांचा धाकटा मुलगा जयंत नि त्याच्यापेक्षां एक–दोन वर्षांनीं मोठी असलेली सुलोचना, हींच त्यांचीं आवडतीं मुलं होतीं. बाकीचीं मुलं बहुतेक नेभळट होतीं. सांगितल्या कामाचीं नि घातल्या अन्नाचीं राहाण्यांत त्यांना समाधान वाटत असे. तेंच सदाशिवरावांना आवडत नसे. ते म्हणत, " माझ्या मुलांनीं माझा अपमान केला, मला सोडून निघून गेलीं तरी सुद्धां मला वाईट वाटणार नाहीं. पण त्यांनीं कांहीं तरी स्वतंत्र बाणा दाखवावा असं मला वाटतं; आणि माझ्या दुर्दैवानं या दोन मुलांखेरीज बाकीच्या मुलांत बाणेदारपणा कसा तो नाहींच,— याचंच मला दुःख होतं."

आमच्या खाणावळींत येणारे बँकेचे क्लार्क दिनूभाऊ हे सदाशिवरावांचे एक स्नेही होते. बँकेच्या व्यवहारामुळंच त्या उभयतांची मैत्री जमून आली होती. दोघांचाही स्वभाव थोडथोडा चर्चेखोर नि स्वतंत्र बाण्याचा असल्यामुळं दोघांचं मोठं मेतकूट जमलं होतं.

आधींच सदाशिवरावांना माझ्या बद्दल अभिमान—त्यांतून दिनूभाऊ येऊन माझी तारीफ करूं लागले म्हणजे मला अधिकच लाजल्या सारखं होई.

दिनूभाऊ म्हणायचे, “ देवदयेनं सत्यभामाबाईची स्थिति सुखासमाधानाची झाली आहे. खरं पाहिलं तर या पोरीनं गाडीघोड्यांतून मिरवून दिवस काढायचे. असं जरी आहे तरी हातांत परात घेऊन ही वाढूं लागली म्हणजे मला मोठं कौतुक वाटतं आणि सत्यभामाबाईच्या शिस्तीची तारीफ करावीशी वाटते. आतां हल्लीं हल्लीं ही थोडीशी मिजासखोर होऊं लागली आहे—नाहीं असं नाहीं. मनुष्याचं वय जसजसं वाढूं लागतं तसतशी श्रीमंतीची जाणीव त्याला मिजास आणते. हा कांहीं मोठासा दोष आहे असं नाहीं. पण श्रीमंत असूनदेखील शालिन्य कायम ठेवलं तर त्याला विशेष शोभा येते, हें या पोरीला अजून कळत नाहीं याचंच मला दुःख होतं. ”

दिनूभाऊंच्या या भाषणाचा मला राग आला. मी म्हटलं, “ आतां स्पष्टच विचारतें, काय माझी मिजासखोरी पाहिलीत तें आतां यांच्यासमोर सांगा ! रोज तुम्हीं असंच म्हणतां–मी विचारतें—नि तुम्हीं मला कांहींतरी उत्तर देऊन माझं समाधान करूं पाहातां. आज कांहीं मी स्वस्थ बसणार नाहीं ! काय माझा दोष आहे तो मला कळला म्हणजे पुढं कसं वागावं एव्हढं तरी मला कळेल. तुम्हांला माहीतच आहे, कीं माझं सारं आयुष्य खाणावळींतच गेलं. कुटुंबवत्सल माणसांचीं घरं पाहिलीं, कीं मला त्यांचा हेवा वाटूं लागतो. आपलीं चारदोन माणसं–एकामेकांशीं मिळून मिसळून राहिलेलीं—तेव्हढ्याच चारदोन माणसांची वर्दळ–नि तेवढाच चिमुकला संसार पाहिला म्हणजे आमच्या घरच्या रामरगाड्याचा मला तिट्कारा येऊं लागतो. अशा ठिकाणीं वागायचं कसं, नि शालिन्य दाखवायचं कसं, हें तरी मला सांगाल. ”

दिनूभाऊ हंसले, सदाशिवरावही हंसले. सुलोचनेनं मला हंसतां हंसतां चांगलंच खुबळलं. सर्वांनाच गंमत वाटण्याजोगं असं मी बोललें तरी काय, याचं माझं मलाच आश्चर्य वाटलं.

दिनूभाऊ म्हणाले “ असं पाहा वेणूताई, हे भेद मोठे सूक्ष्म आहेत.

मोठ्या चुका असल्या म्हणजे त्या चट्कन दाखवून देतां येतात. पण माणसाच्या स्वभावांत जे सुईच्या अग्रासारखे बारीक बारीक फरक होत असतात, ते तितके चट्कन दाखवून देतां येत नाहींत. चुकीच्या आणि खिळ्यांच्या आघातानं कदाचित जखमा होतील पण सुई बोचली तर तिनं रक्तसुद्धां यायचं नाहीं. पण ती बारीकशी टोंचणी मात्र माणसाला चांगलीच जाणवते-तसं तुझं झालं आहे. यापूर्वी तूं वाढायला आलीस म्हणजे इतर वाढप्यांसारखीच एक 'मुलगी वाढपी' आहे एवढंच मला वाटे. पण आईच्या अनुकरणानं म्हणा किंवा लोकांच्या चिथावणीनं म्हणा, तुला अलिकडे मोठेपणाचा नसता आव आणण्याची संवय लागली आहे. पूर्वीच्या वर्तनांत आणि आजच्या वर्तनांत हा फरक किती झाला आहे, हें कांहीं मला हात पकडून दाखवतां यायचं नाहीं. पण तुझा तूंच आपल्या मनाशीं विचार कर म्हणजे हा फरक तुला जाणवेल. आणि जर तो तुला तसा जाणवला नाहीं, तर तुझ्या अंगीं सूक्ष्म बुद्धि नाहीं असं मी म्हणेन-नाहीं तर मीच गाढव आहें म्हणून तूं म्हण —" असं म्हणून दिनुभाऊ मोठमोठ्यानं हंसले.

तो भेद मला कळत होता—चांगला जाणवत होता—पण माझ्या स्वभावांत झालेला हा फरक दुरुस्त कसा करावा, हें मात्र मला कळत नव्हतं.

एक दिवस एक चमत्कारिक घटना घडून आली.

सर्वांचीं जेवणं झालीं होतीं नि एक गृहस्थ घाईघाईनं येऊन जेवायला बसले. मी जात होतें-तों सहज माझी नजर गेली. मी थांबलें. चांगलं निरखून पाहिलं नि म्हटलं, "कोण, बाळासाहेब !"

ते बाळासाहेबच होते यांत शंका नव्हती. पण मी नांवानं हाक मारली तरीही त्यांनीं उत्तर दिलं नाहीं.

## प्रकरण ७

## माझं वैभव कुणाचं ?

मला वाटलं त्यांनीं मला ओळखलं नाहीं. मी घरांत जाऊन आईला सांगितलं तशी आई बाहेर आली. बाकीचे जेवणारे जेऊन गेले होते. एकटेच बाळासाहेब जेवत होते.

आई येऊन समोर उभी राहिली असं पाहून बाळासाहेब म्हणाले, " एकूण ही ' तुमची ' खाणावळ तर ! आणि ही वेणू वाटतं ! केवढी मोठी झाली ! मी कांहीं तिला ओळखलं नाहीं—"

आईनं विचारलं, " साहेब कुणीकडे आहेत ? बाकीचीं माणसं कुठं आहेत ? "

बाळासाहेब वर न पाहतांच म्हणाले, " आतां कुणींच राहिलं नाहीं. मुळखुटा एकटाच मी काय तो हयात आहें. नोकरी पहायला आलों आहें मुंबईला. "

" म्हणजे गांवीं होतां वाटतं अजूनपर्यंत ! "

पाण्याचा पेला तोंडाला लावून गटागट पाणी पिऊन, पेला खालीं ठेवतांना चांगलाच जोरानं आपटून बाळासाहेब म्हणाले, " हो हो, गांवीं होतों अजूनपर्यंत. पेन्शन घेतल्यावर फारां दिवसांनीं आमच्या बाबांना लहर आली होती शेतीची. शेती करीत होते. नांगर सुद्धां धरीत होते स्वतः ! मलाही शेतीला लावायचा त्यांचा विचार होता. सारं आयुष्य साहेब म्हणून मिरवल्यावर, म्हातारपणीं शेती करणं चांगलंच जुगलं असतं

त्यांना ! पण सारं आयुष्य आमच्या पुढं आहे याची त्यांना कुठं दाद होती ? ते साहेब झाले होते तसं आम्ही साहेब होऊं नये का ! पण मॅट्रीक होतांच त्यांनीं मला शेतीला लावायचा बेत केला. मी साफ नाकारलं. आमची चांगलीच चकमक उडाली आणि मी गेलों निघून भटक्या मारीत ! एका सर्कसकंपनी बरोबर होतों बरींच वर्षे. शेतावरचे बैल चुकवले पण सर्कशींतलीं घोडींगाढवं खाजवायचं होतं ना माझ्या कपाळीं ! एक दिवस तार आली—कॉलऱ्यानं आमच्या घरचीं सारीं माणसं मेलीं."

पुन्हां एकदां बाळासाहेबांनीं पाणी पिऊन घेतलं.

"कंपनी सोडली—गांवीं गेलों, होतं नव्हतं तें विकून टाकलं आणि स्वतःची सर्कस कंपनी काढली. नशीब तिथंही माझ्या हात धुऊन मागं लागलं होतं. त्या सर्कशीचेही बारा वाजले आणि आतां कुठं तरी कारकुनी मिळाली तर पाहावी, म्हणून पुनः मुंबईच्या उंबरठ्यावर पाऊल ठेवलं. ही तुमची खाणावळ, हें मला माहित नव्हतं—"

"आमची कसली ? आहे हें सारं तुमचंच आहे." माझी आई म्हणाली, "दुसऱ्या कुठं राहायची सोय नसली, तर इथं येऊन राहा. भरपूर जागा आहे इथं. तुम्हांला एक स्वतंत्र खोलीच देतें. आपलं घर समजून रहा. कांहीं संकोच धरूं नका. किती झालं तरी आम्हीं तुमच्या अन्नावर वाढलों आहोंत. आहे हें सारं तुमचंच आहे."

'आहे हें सारं तुमचंच,' असं म्हणतांना आईनं जो आविर्भाव केला, त्यावरून मला आईच्या मनांत त्यावेळीं येणाऱ्या विचारांची कल्पना आली. खरोखर हें सर्व त्यांचंच होतं. बाळासाहेबांच्या आईनं दिलेल्या भांडवलावर ही खाणावळ थाटली होती. मला प्रश्न पडला, आईनं हा औपचारिकपणा दाखवला, कीं खरोखरच पूर्वीची जाणीव तिला आहे ?

बाळासाहेब म्हणाले, "एका अर्थी बरं झालं, तुमची भेट झाली हें ! ही खाणावळ तुमची आहे, हें मला माहीत नव्हतं. ब्राह्मणाची खाणावळ

म्हणून पाटी पाहिली, नि इथं शिरलों. सामान अजून स्टेशनवर क्लोकरूममध्ये ठेवलं आहे. तुम्हीं एवढा लोभ धरतां, मग नाहीं कसं म्हणूं ? आमचे बाबा होते साहेब, रहात होते नेपियन्सी रोडवर, गांवच्या लोकांशीं कधीं संबंध ठेवला नाहीं. बाबांच्या मित्रांना शोधून काढीन म्हटलं, तर या मुंबईत तरी कुणी सांपडतील असं मला वाटत नाहीं. असतील कुणी तसलेच मोठे साहेब. पण ते कसं वागवतील, याची बाबांच्या वागणुकी-वरूनच मला चांगली कल्पना आहे. कुणाचा तरी आधार मला या वेळेला पाहिजेच आहे. इथंच सामान घेऊन येतों झालं ! ”

आईचा हा चांगुलपणा कांहीं मला पटला नाहीं. बाळासाहेबांबद्दल पूर्वीपासूनच माझं मन कलुषित झालेलं होतं. आतांचं त्यांचं हें भाषण त्या जुन्या समजुतींत फरक करील अशा प्रकारचं नव्हतं. ज्या माणसाला स्वतःच्या बापाबद्दल आदर नाहीं, एवढ्या प्रेमळ आईचा नुसता उल्लेख सुद्धां जो करीत नाहीं, त्या माणसाला आई बळेंच घरांत घेते आहे, हें कांहीं मला पटलं नाहीं.

मी आईला जरी तसं बोलून दाखवलं नाहीं, तरी माझ्या चर्येकडे पाहून ती आंत आल्यावर म्हणाली, “ असं पहा वेणू, मुळाला विस-रून चालत नाहीं. बरा असो, वाईट असो, पण मुलगा बाईसाहेबांचा आहे. आज संकटांत आहे. संकटं कुणावर येत नाहींत ? साहेबांची एवढी इस्टेट होती, पण आज त्यांचा मुलगा भीक मागायला घराबाहेर पडला आहे ना ? तूं आतां कांहीं लहान नाहींस. यंदा मॅट्रीक होणार आहेस. मॅट्रीक झालेला मुलगा असला, तर तो नोकरीला लागून घरसंसार चालवतो. लहान वयांत तूं अभ्यास केलास, तुला संधि मिळाली म्हणून लहान वयांतच आज मोठ्या माणसांच्या पंगतीला बसलीस, तो मोठेपणा मनातं आणला पाहिजे. त्रास झाला तरीदेखील घटकाभर सोसला पाहिजे. पण बाई ग, मुळाला विसरून चालायचं नाहीं. मूळ विसरून कुणाचं कल्याण झालं नाहीं. मूळ न विसरल्यानं हाल होतील, त्रास होईल, उप-

सर्ग देखील होईल, पण अकल्याण खास होणार नाहीं, हें मी तुला बजावून सांगतें."

उभ्या आयुष्यांत इतक्या जिव्हाळ्यानं आई माझ्याशीं कधींच बोलली नव्हती. तिच्या तोंडून निघालेले उद्गार इथं लिहिलेले वाचण्यांत वाचकाला तिची कळकळ कळणार नाहीं—पण पिळवटलेल्या अंतःकरणांतून निघालेले ते उद्गार मी या जन्मीं तरी विसरणार नाहीं.

मला शरम वाटली. बाईसाहेबांच्या पैशावरच हें वैभव उभारलं होतं, याची आठवण असतांना सुद्धां मला तें तसं वाटावं, याची माझी मलाच लाज वाटली. माझ्या कमकुवतपणाबद्दल मी मलाच दोष दिला. खरं पाहिलं तर हें 'मी' बोलायला हवं होतं. या खाणावळीची मी मालकीण आहे, अशी जाणीव मला झाली होती ना ? मग ती कृतज्ञता दाखवण्याचा खरा अधिकार माझा होता, हें कसं माझ्या ध्यानीं आलं नाहीं ? मी म्हटलं, "मला क्षमा कर आई. मी बोललें नाहीं, तरी तूं बाळासाहेबांना इथं ठेऊन घेतलंस याचं मला वाईट वाटत होतं–तुला तें कळलं नि तूं माझ्या डोळ्यांत अंजन घातलंस, हें फार चांगलं झालं. हालअपेष्टा झाल्या तरी चालतील, त्रास झाला तरी चालेल, पण मी बाळासाहेबांच्या आईविषयीं कधींही कृतघ्न होणार नाहीं."

माझी पाठ थोपटून आई म्हणाली, "तरी म्हटलं माझी वेणू आहे."

तिचे डोळे ओले झालेले दिसले; माझ्याही डोळ्यांतून पाणी आल्यावांचून राहिलं नाहीं.

बाळासाहेबांनीं आपलं बिऱ्हाड आमच्या घरीं थाटलं. जेवणाच्या वेळेखेरीज ते बहुतेक घरीं नसत. रात्रीं झोंपायला येत तेव्हढेच. आपण काय करतों, कुठं जातों, नोकरीचा प्रयत्न कुठं करीत आहोंत, याचा कित्येक दिवस त्यांनीं थांगपत्ता लागूं दिला नाहीं. आईनं किंवा मी त्यांना कांहीं विचारलं नाहीं.

आमच्या गांवचे नाझर आमच्या घरीं येऊन रहात असत त्यावेळीं

कुणी कांहीं तक्रार करीत नसे. पण बाळासाहेब येऊन राहिल्यापासून इनामदार–जेवणारांत थोडी थोडी कुजबुज सुरू झाली. मी आतां मुलगी या सदरांत राहिलें नव्हतें. एवढी मोठी वाढलेली मुलगी घरांत असतांना, एक परका तरूण सत्यभामाबाईनीं आपल्या घरीं आणून ठेवावा हें आईबद्दल अभिमान बाळगणाऱ्या जेवणकऱ्यांना रुचलं नाहीं. दिनूभाऊनीं तर एक दिवस आईला उघड विचारलं. तेव्हां ती म्हणाली, " तुम्हांला माहीत नाहीं दिनूभाऊ, त्यांचे माझ्यावर अनंत उपकार आहेत. त्यांच्या कृपेनं आज हा एवढा खाणावळीचा पसारा थाटला गेला आहे. त्यांच्या प्रसंगाच्या वेळीं जर मी त्यांना हात दिला नाहीं तर देवाच्या घरीं मी कृतघ्न नाहीं का ठरणार ? "

दिनूभाऊ म्हणाले, " तें खरं आहे. पण थोडंसं लोकाचाराकडे पाहिलं पाहिजे. तुम्ही एकट्या बाई माणूस, ही वाढलेली मुलगी घरांत, हा एक परका तरूण आलेला, वर्तनानं फारसा सभ्य दिसत नाहीं, दिसतोही अगदींच मवाली–आणि म्हणतात आहेही अगदीं व्हॅगबॉंड. कुठल्या सर्कशींत होता ! हीं नाटकासर्कशींतलीं माणसं आम्हां सभ्य लोकांना तरी पाहिल्याबरोबर संशयास्पद वाटतात. उपकार असले तरी ते फेडण्याचे मार्ग आहेत. दुसऱ्या कुठं तरी त्यांना स्वतंत्र खोली पाहून द्या; पण तुमच्या घरीं ठेऊन घेऊं नका. तुमची बेअब्रू होईल तसंच खाणावळीचंही नांव जाईल. लोक चर्चा करूं लागले आहेत म्हणून मुद्दाम तुमच्या कानीं घातलं. आम्ही झालों तरी परकी माणसं. सत्तेनं तुम्हांला सांगतां यायचं नाहीं. पण इतके दिवस तुमच्या घरीं जेवतों आहोंत, घरच्या माणसासारखंच तुम्ही आम्हांला वागवतां, म्हणून लोकांनीं तुम्हांला नांवं ठेवलेलीं आम्हांला खपणार नाहींत म्हणून एवढं बोललों. पुढं तुमच्या तुम्ही मुक्त्यार आहांत. "

दिनूभाऊंच्या बोलण्यांत कठोरपणाच जास्त होता. आपल्या बोलण्याचा माझ्या आईच्या मनावर परिणाम व्हावा, तिनं बाळासाहेबांना

आपल्या घरांतून दुसरीकडे कुठं तरी नेऊन ठेवण्याची व्यवस्था करावी, म्हणून ते शक्य तितक्या तुटक वाणीनं बोलत होते.

आईच्या मनावर त्या भाषणाचा परिणाम झाला. ती विचारांत पडली. ते गेल्यावर ती म्हणाली, " तुला काय वाटतं वेणू ? ते म्हणतात तसं करायचं का ? एकंदरींत तें कठीण आहे. आपल्या घरीं येऊन राहा म्हणून आपणच त्यानां सांगितलं. आतां तुमच्यासाठीं दुसरी खोली घेतली आहे असं म्हणून दुसरीकडे त्यांना घालवून द्यायला असं कारण काय दाखवणार आपण ? इथली जागा आहे तशीच राहाणार. ते गेले तरी ती मोकळीच राहाणार आहे. त्यांना चमत्कारिक नाहीं का वाटायचं ?"

मला मोठा प्रश्न पडला. काय उत्तर द्यावं हें मला चांगलंसं सुचेना. तरीही मी म्हटलं, "तें तुम्ही तूंच पहा आई. मला त्यांत कांहीं कळत नाहीं. त्यावेळीं बाळासाहेब मला त्रास देत असत पण इथं आल्यापासून ते कधीं माझ्याशीं दोन शब्दसुद्धां बोलले नाहींत. औपचारिक कसं आहे, काय आहे, असे देखील कधीं उद्गार काढीत नाहींत. किंबहुना मी त्यांच्या ओळखीची आहें असं सुद्धां वाटत नाहीं; मग मी काय म्हणून त्यांच्याबद्दल तक्रार करूं ? पण लोकांत कुजबूज चालली आहे हें मात्र खरं आहे. शाळेंतसुद्धां मला ऐकूं येतं. किचकटपणानं आडवेतिडवे डोळे मिचकावून माझ्या बरोबरीच्या मुली खंवचट प्रश्नही करतात. मला आश्चर्य वाटतं तें हेंच, कीं माझ्या घरच्या उठाठेवी या लोकांना कां ? माझ्या घरीं मी दहा माणसं आणून ठेवीन. तिथं लोकांचं कांहीं खर्चंत तर नाहीं ! "

"अजून तुला पुष्कळ कळायचं आहे—वेणू." आई म्हणाली, "स्वतःच्या डोळ्यांतलं मुसळ दिसत नाहीं पण दुसऱ्याच्या डोळ्यांतलं कुसळ फुंकरायला लोक सदा टपलेले असतात. इतकंच नव्हे, तर नसलेलीं कुसळं शोधून काढायला अगदीं डोळ्यांत तेल घालून सज्ज होतात.

मी ही अशी अनाथ अपंग. पुरुष माणसाचा आधार नाहीं. आपल्या पायांवर उभी राहणारी बाई पाहिली म्हणजे या लोकांचे डोळे फाटतात. त्यांत हा खाणावळीचा धंदा. खाणावळवाल्यांबद्दल लोक काय बोलतात, काय म्हणतात, हें तुला एव्हांच कळायचं नाहीं. पण या अशा दिव्यांतून तावून सुलाखून बाहेर पडायचा मी प्रयत्न करतें आहें; नि तिथं बाळासाहेबांच्या रूपानं हें माझं दुर्दैव उभं राहिलं त्याला मी तरी काय करूं ? कसं त्याला जा म्हणूं ? स्वर्गांतून त्या बाईनं माझ्या-कडे पाहिलं तर ती काय म्हणेल ? ऐकलंस वेणू, काय व्हायचं असेल तें होईल पण त्या माउलीच्या आठवणीसाठीं तरी तिच्या पोराला मी माझ्या घराबाहेर घालवणार नाहीं."

आईचा मला मोठा अभिमान वाटला. आजपर्यंत मला असं वाटे, कीं माझी आई म्हणजे एक व्यवहारी बायको आहे. पण तिला देखील अंतःकरण आहे, कृतज्ञतेची जाणीव आहे, हें पाहून माझं हृदय आनं-दान भरून आलं.

त्या दिवशीं मी मुद्दाम सदाशिवरावांना भेटायला गेलें नि झालेली हकीकत त्यांना सांगितली. त्यांचंही मत जवळ जवळ दिनुभाऊसारखंच पडलेलं पाहून मला वाईट वाटलं. सुलोचनेच्या आईला मी विचारलं पण ती ठाम असं कांहींच मत देईना. ती म्हणाली, " जगाच्या व्यव-हारांत आम्हां बायकांनां काय समजतं ? पुरुषांची नजर मोठी तिखट असते. ते चोहोंकडे वावरत असतात. चार टक्केटोणपे खायची त्यांना सवय असते. बऱ्यावाईट प्रसंगांतून मार्ग काढलेले असतात ते पुरुषांनीं. बायकांचं काय–हाताला हात लावून त्यांच्याबरोबर चालायचं—तशीच मी आपली चालतें. माझ्या मनाला वाटतं, कीं तुझी आई म्हणते तेंच बरोबर; पण हें बायकी मत हिशेबांत घेणार कोण ? आतांच यांनीं काय सांगितलं तें ऐकलंस ना ? वाढलेली मुलगी घरांत असतांना संशयास्पद वर्तनाचा माणूस घरांत आणून ठेवणं त्यांना पटत नाहीं असं ते म्हणाले,

तें मलादेखील बरंचसं खरं वाटतं. यांतून मार्ग काढायचं काम आहे तुझ्या आईचं. पुरुषी बाणा पत्करला आहे कीं नाहीं तिनं ! कुणा पुरुषाच्या आधारावांचून आज लाखांचा व्यवहार करते आहे, ती आमच्यापेक्षां कांहींतरी जास्त बुद्धी आहे म्हणूनच ना ? तेव्हां मी तुला सांगतें, तूं तिच्या निकालावरच अवलंबून राहा. स्वतः यावर कांहीं मत देऊं नकोस कीं नको म्हणूं नकोस. तिची ती मुखत्यार आहे तशीच तिची ती खंबीर आहे. तूं यांचंही ऐकूं नकोस आणि दिनूभाऊंचंही ऐकूं नकोस. काय होईल तें पाहात स्वस्थ राहा म्हणजे झालं. ”

सुलीच्या आईचं तें गुळमुळीत उत्तर ऐकून मला तिटकारा आला. स्वतः विचार करायची या बाईला संवयच नाहीं का ? ‘हे म्हणतात तें ही खरं, ते म्हणतात तेंही खरं, नि स्वतःला वाटतं तेव्हढंच मात्र अनिश्चित’ असं कां या बाईला वाटावं ? एव्हढीं आज पांच सात मुलं झालेली कर्तीसवरती बाई ही, तिला एव्हढ्याशा बाबतींत मत देतां येऊं नये !—‘ते काय म्हणतात ऐकलंस ना ? ’ असं म्हणून हिनं स्वस्थ राहावं ! हिला कांहीं स्वाभिमान नाहीं का ?

हें सर्व भाषण चाललं असतां सुलोचना तिथंच होती. ती माझ्यापेक्षा चांगली दोन वर्षांनीं मोठी होती. मी तिला विचारलं, “ आतां तूंच सांग सुले, हें सारं कांहीं तूं ऐकलंस. तुला काय वाटतं ? ”

सुलोचना क्षणभर विचारांत पडल्यासारखी दिसली. मी पुन्हां विचारलं तेव्हां ती म्हणाली, “ यांत मी काय सांगावं बाई ? हीं कोण कोण माणसं काय काय म्हणत आहेत तेंच मला कळत नाहीं. तुम्हीं त्यांच्या घरीं पूर्वी राहिलां होतां. एका काळीं ते तुमचे मालक होते, तेच प्रसंगीं आज तुमच्या घरीं येऊन राहिले तर लोकांना कां वाईट वाटावं हेंच मला कळत नाहीं. लोकं नांवं ठेवतात हें मी ऐकतें आहे. पण कां नांवं ठेवतात तें मला माहीत नाहीं. बाबा हें असं म्हणतात, आई तें तसं म्हणते. मी अजून चांगला विचार करून पाहीन आणि पुन्हां

कधीं तरी सावकाशपणें आईबरोबर आणि बाबांबरोबर चर्चा करीन नि मग उद्यां तुला सांगेन. ”

सुलोचनेचा तो दुबळेपणा पाहून मला तिची कींव आली. स्वतंत्र विचार करण्याची संवय मला लागलेली असल्यामुळें सुलोचनेच्या या परबुद्धीनं चालण्याच्या वृत्तीबद्दल मला तिच्या आईचा जितका तिट्कारा आला तितकाच तिचा तिट्कारा आला, असं म्हटलं असतां वावगं होणार नाहीं.

सुलोचना माझी जिवाभावाची मैत्रीण होती. पण ती दुबळी होती म्हणूनच माझी मैत्रीण झाली होती याची ज्या वेळीं मला आठवण झाली, त्या वेळीं तो तिट्कारा आपोआप नाहींसा झाला.

आयुष्यांतल्या एका नव्या प्रांतांत आपल्याला आतां पाऊल टाकावं लागणार आहे नि त्यांत खांचखळगे भयंकर आहेत, ते पार होऊन जाण्यासाठीं आपल्याला सावधगिरी बाळगली पाहिजे, एव्हढं मात्र मला या साऱ्या प्रसंगावरून कळून चुकलं.

# प्रकरण ८

## बाळासाहेब माझे नोकर झाले

मी मनाशीं निश्चय ठरवला —काय होईल तें होवो, कोण काय म्हणतील ते म्हणोत-पण या वादळाला चांगलंच तोंड द्यायचं.

बाळासाहेबांचा दिनक्रम जरी पूर्वीसारखाच सुरू होता तरी लोकांच्या खजाळ्या मात्र भयंकर वाढल्या होत्या. भर पगंतीवर चर्चा करतांना माझ्यावर आणि माझ्या आईवर उघड उघड शिंतोडे उडवले जात होते.—मला संशय होता, कीं खाणावळींतलीं नोकर माणसं देखील या कामीं सामील होतीं.

मी ऐकत होतें. जेवणारे एक गृहस्थ म्हणत होते, "अहो, हें असंच चालायचं. हा सारा कली माजला आहे. खाणावळींचं कशाला नांव घेतां. मुंबईत बाहेर काय चाललं आहे, तें पाहा. एव्हढ्या एव्हढ्या पोरी अगदीं एकेकट्या फिरत राहातात कीं हो! त्यांचे मित्र असतात म्हणे! कॉलेजांत शिकतात कीं नाहीं! पोरापोरींना एकाच जागीं शिकवतात तेव्हां मैत्री ही जडायचीच—तेव्हां असले ते मित्र घेऊन फिरायला गेल्याशिवाय जगतां कसं येईल अलिकडच्या पोरींना? या पूर्वीच्या आमच्या आया आज्या होत्या त्यांचे कुठं मित्र नव्हते ते! त्यांना कुठं फिरायला जायला लागत नव्हतं तें? अहो काळ बदलला आहे. आम्ही तरी कुठं म्हणतों, अगदीं घरांतच गाडून राहा म्हणून; पण पोरींनीं जायचं तर पोरीपोरींनीं जावं. चांगलं माणसासारखं जावं.

अहो तो काय पदर ! पुरुष पूर्वी उपरणं घेत असत. आतां त्यांनीं तें टाकलं. तेव्हां या कारव्या आतां उपरण्यांसारखे पदर घेऊं लागल्या आहेत. आणि ते उडत असतात वाऱ्यानं. रस्त्यावरून मुली चालूं लागल्या म्हणजे मुंबईचे एवढे मोठे रस्तेदेखील लहान वाटूं लागतात. बाहेर जिथं असं आहे तिथं खाणावळींत काय ! तरी बरं. माधवाश्रम, एंपायर हॉटेल, आर्य-पथिकाश्रम यांच्यासारखी इथं राहायची सोय नाहीं. तशी सोय असती तर शेजारीं मॅटर्निटी होम उघडावं लागलं असतं. काय करतां—चांगलं जेवण असतं म्हणून इथं येतों एव्हढंच. डोळे झाकून चार घास गिळायचे आणि जायचं आपल्या कामाला. आपल्याला काय करायचं आहे या उठाठेवींशी ?"

दुसरा म्हणत होता, " चुकतां आहांत तुम्ही मनोहरपंत. आपल्याला काय करायचं आहे, असं म्हणून चालायचं नाहीं. आपण इथं येतों आहोंत—उद्यां लोक आपलं नांव घ्यायचे. मुंबईत कांहीं तोटा नाहीं खाणावळींना—"

तिसरा एक म्हणाला. "तुम्हीं माणसं आहांत, कीं जनावरं आहांत ? असा झाला काय अनर्थ, कीं अगदीं खाणावळ सोडण्यापर्यंत प्रसंग आला ? कुणाचं चांगलं झालेलं पाहावत नाहीं तुम्हाला, एव्हढंच खरं. इतिहास माहीत आहे का तुम्हांला ? त्यांच्या घरींच त्यांना पहिल्यांदा आश्रय मिळाला होता. आतां त्या बिचाऱ्यावर प्रसंग आला. नको त्याला आसरा द्यायला ? आणि त्या पोरीचं नांव कशाला गोवतां या भानगडींत ? ती कधीं कुणा तुमच्या वाटेला गेली आहे ? कशी चोख आहे आपल्या अभ्यासांत ! माझ्या एका मित्राची मुलगी तिच्याच शाळेंत असते. ती तिची केव्हढी तारीफ करते !—बरं, एव्हढं असून अभिमान बाळगते आहे का ती पोरगी ? एव्हढंसं कुठं शिक्षण मिळालं तर हल्लींच्या पोरी शेफारून जातात. पण ही पहा. गर्दी झाली कीं, स्वतः खोचण खोवून वाढायला सरसावते. शंभर माणसांची पंगत असली तरी कधीं

कुणाची खोटी होऊं देत नाहीं. म्हणून मला त्या पोरीचा अभिमान वाटतो—"

जनूभाऊ म्हणाले, " अरे, जेवणावर तुम्हांला दुसरं नाहींच का कांहीं सुचत ! कांहीं राजकारण बोला, म्युनिसिपालिटीच्या हकिकती बोला, नाहीं कांहीं सुचत तर नाटकासिनेमाच्या गोष्टी बोला. गटारं कशाला उपसतां हीं ?—"

पहिला गृहस्थ म्हणाला, " गटारं कां उपसतो ? अहो, गटारं आहेत, त्यांच्यांत घाण होते, म्हणूनच ना उपसतों ? इथं गटारं बांधावीं कां ? बांधलीं तर त्यांत घाण करावी कां ? आणि घाण केली तर ती दुसऱ्याच्या नजरेला यायच्या पूर्वी साफ करून टाकूं नये कां ?—"

तीं भाषणं ऐकून त्या लोकांची कींव करावी कीं आपल्या मनाची करमणूक करून घ्यावी, हेंच मला कळेना. शून्यावर उभारलेले हे मनोरे आजूबाजूला सावली पाडीत होते, तरी देखील आज ना उद्यां कोसळून पडणार होते यांत संशय नव्हता. पण आज त्यांचा परिणाम होत होता.

चढावाचं धोरण स्वीकारायचा मी निश्चय केला—नि आईला तसं मी सांगितलंही.

संध्याकाळीं बाळासाहेब ज्यावेळीं जेवायला आले त्यावेळीं त्यांना वाढायला मीच मुद्दाम गेलें. अर्थातच त्यांच्या पंगतीला इतर मंडळी होती त्यांना मी वाढीत होतेंच. वाढीत असतांना मी विचारलं, " काय बाळासाहेब, कांहीं लागला का नोकरीचा सुगावा ? का रोज अजून अर्जच करीत आहांत ?—"

शेजारचे दुसरे गृहस्थ म्हणाले, " अहो, नोकरी काय अशी वाटेवर पडली आहे ? बी. ए. एम्. ए. झालेले बसले आहेत फांक्या मारीत. परवांच एम्. ए. एल्एल्. बी झालेला एक मनुष्य—शॉर्ट हॅन्ड टाइपिंग देखील येत होतं त्याला—तीस रुपयांवर राहिला आहे तीस रुपयांवर ! "

" खरं आहे. " बाळासाहेब म्हणाले, " जिथं जावं तिथं सर्टिफिकिटं विचारतात. पूर्वी मी नोकरीच केली नाहीं कुठं, तर सर्टिफिकिट आणायचं कुठून ? मी म्हटलं, आतांच काय ती परीक्षा घ्या. पण कुणी ऐकत नाहीं. आतां एक उपाय योजला आहे. फेरीवाल्याचा धंदा करणार आहे."

पंक्तिवरचे सगळे लोक मोठमोठ्यानें खो खो करून हंसले.

" हंसतां काय ? " बाळासाहेब म्हणाले, " खरोखरच फेरीवाला बनणार आहे. परवां रस्त्यांत एका फेरीवाल्याशीं बोलत उभा होतों, त्याला विचारली त्याची कमाई नि मनाशीं निश्चय केला, कारकून म्हणून दहा वर्षे राहीलों तरी इतकी कमाई व्हायची नाहीं. मग कां फेरीवाल्याचा धंदा करूं नये ?—"

"अल्बत !" एक जण म्हणाला, "त्यांनून विशेषतः कापडाचा करावा, लुगड्यांचा करावा. दुपारीं जावं चाळींतून फिरायला—बरं का—दुपारीं जावं. व्यापारही होईल, चैनही होईल— " तो गृहस्थ मोठमोठ्यानं हंसला. मला अशी चीड आली होती, कीं जाऊन त्याच्या थोबाडींत लगावावी. पण तो राग गिळून मी म्हटलं, "दुपारीं कशाला जायचं?—"

माझ्या प्रश्नानं तो चमकला. " तें असं आहे " तो म्हणाला, " जेवणंखाणं सारीं झालेलीं असतात. दुपारच्या प्रहरीं पुरुष माणसं नसतात घरांत—आणि बायकांना कपड्यांची विशेषतः हाव फार. पुरुषांना जशी परीक्षा असते तशी बायकांना थोडीच असते ! तेव्हां व्यापार करायला हीच वेळ—हो—हो—हो ! "

" असं का ? " मी जरा खोंचून म्हटलं, " इथंच तुमचं चुकलं. पुरुषांनाच कपड्याची पारख नसते. जुन्या काळच्या घ्या किंवा आजच्या घ्या—बायकाच कापड खरेदी करीत आल्या आहेत. आमची आई सांगते, कापडचोपड खरेदी करायचं असलं तर पूर्वीच्या काळीं लुगड्यांचीं बासनं बांधून पुरुष घरीं दाखवायला घेऊन येत असत. बायकाच त्यांच्या किंमती ठरवित, त्याच पसंत करीत. पुरुष नुसतं हमालाचं काम करीत. हल्लीं

तर बायकाच दुकानांत कापड घेतात. चांगली पारख असते त्यांना मालाची. उद्यां चला माझ्या बरोबर दुकानांत. तुम्हीं कापडाची किंमत करा नि मी करतें. दुकानदाराला सांगूं परीक्षा घ्यायला."

"नाहीं, तसं माझं म्हणणं नाहीं," तो गृहस्थ म्हणला, "बायकांन देखील कापडाची परीक्षा असते; नाहीं असं नाहीं. पण साऱ्याच बायका कुठं इतक्या हुषार असतात ! भोळवट बायकाच नेहमींच्या जगांत जास्त आढळतात. त्यांना फसवायला फेरीवाल्यांनीं चाळींचाळींतून फिरलं म्हणजे बरं साधतं. फसवल्याशिवाय कांहीं व्यापार होत नाहीं. अहो व्यापारी एवढे जे श्रीमंत होतात ते काय मोठ्या सचोटीनं ? तुम्ही उगीच विपर्यास केलात माझ्या बोलण्याचा. तसं कांहीं म्हणण्याचा माझा उद्देश नव्हता."

भाषणाचा पूर्णविराम झाला. पुढं कुणीच कांहीं बोललं नाहीं.

बाळासाहेब ज्यावेळीं आपल्या खोलींत जाऊन बसले त्यावेळीं मी तिथं गेलें. मी आलेली पाहतांच ते दचकले. मी विचारलं, "खरोखरच का फेरीवाल्याचा धंदा करणार आहांत ?"

"आहे असा विचार—पण फेरीवाला व्हायला देखील भांडवल पाहिजे. दुसरं असं आहे, मनांत पुष्कळ येतं; पण कोणतीही जगाविरुद्ध गोष्ट करायला माणसाच्या अंगीं बेछूटपणा असावा लागतो. आचरटपणानं मी आयुष्य घालवलं आहे. मला वाटतं, तेवढा बेछूटपणा माझ्या अंगीं आहे. पण जसजसा विचार केला तसतसं वाटलं, कीं उपास करावे लागले तरी बेहत्तर—पण इंजिनीयरसाहेबांचा मुलगा फेरीवाल्याचा धंदा करतो आहे, असा बभ्रा व्हायला नको."

"मग काय करणार आहांत. ?"

"तोच विचार करतों आहें. आज एवढे महिने तुमच्याकडे राहिलों, तुम्ही आपलेपणानं वागवतां आहांत म्हणून संकोच न धरतां राहिलों. पण मन खाल्ल्याशिवाय राहात नाहीं. इतक्या दिवसांच्या जेवणाची मी

तुम्हांला एक दमडी सुद्धां दिली नाहीं. मला नोकरी मिळाली म्हणजे सारी फेड करून टाकीन. पण नोकरीच मिळत नाहीं त्याला मी तरी काय करूं ? ”

“ बरं नोकरी मिळाली तर पत्कराल का ? ”

“ तेवढ्यासाठींच तर आलों आहें ना इथं ? ”

“ तुम्ही पाहतां आहांत, कीं हा आमच्या खाणावळीचा पसारा दिवसेंदिवस वाढत चालला आहे. सारे व्यवहार आई पहाते—ती तशीच खंबीर आहे म्हणून तिला सारं जमून जातं—पण तिनं इतके कष्ट करावे असं मला वाटत नाहीं. इथली व्यवस्था पहायचं काम पत्करतां का ? जेवून खाऊन दरमहा पन्नास रुपये पगार देतां येईल असं आई म्हणते. राहण्याची जागा आहेच ही—ती कांहीं हिशेबांत धरायची नाहीं. वाटलं तुम्हांला तर इथं रहा. वाटलं तर दुसरीकडे रहा—”

बाळासाहेब विचारांत पडल्यासारखे दिसले. तें पाहून मी पुन्हां विचारलं, “ कां ? अगदीं संकोच धरूं नका. पन्नास रुपयांची नोकरी मिळणं देखील कठीण आहे हल्लींच्या दिवसांत. ”

“ खरं आहे. खरं आहे. ” मान खालीं घालीत बाळासाहेब म्हणाले, “ पण जरा विचार पडतो—”

“ विचार कसला पडतो. फेरीवाल्याचा धंदा करणार होतां ना तुम्ही ? कापडाची गासडी पाठीवर मारून चाळीचाळींतील जिने उलथणार होतां ना तुम्ही ? मग खाणावळीची व्यवस्था पाहायला संकोच कसला वाटतो तुम्हांला ? आतां एवढं मात्र खरं, कीं व्यवस्था आई ठेवते तशी राहिली पाहिजे. तितक्याच करड्या अमलानं वागलं पाहिजे. नोकरांशीं बरं का ? जेवायला येणाऱ्या लोकांशीं तितक्याच प्रेमळपणानं, तितक्याच कळकळीनं वागलं पाहिजे. आई कशी वागते हें पाहीलं नसलंत, तर चार पांच दिवसपर्यंत नुसतं पहात रहा नि नंतर

पत्करा. आतांच नका उत्तर देऊं पाहिजे तर. सगळा विचार करून नंतर काय तें ठरवा.”

उत्तराची अपेक्षा न करतां मी तिथून निघून गेलें. माझं मलाच मोठं समाधान वाटलं. आईला ही हकिकत मी मागाहून सांगितली. आईला कांहींच न विचारतां मी आपल्या अधिकारांत ही गोष्ट केली होती; पण आईनं देखील माझी योजना ऐकून जेव्हां माझी पाठ थोपटली, तेव्हां माझा आनंद गगनांत मावेनासा झाला.

## प्रकरण ९
## मी शिकूं लागलें

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बाळासाहेब माझ्या आईजवळ आले आणि म्हणाले, "काल वेणूताईंनीं मला सांगितलं तें तुम्हांला विचारूनच?—" आईनं मान हलवली त्यावेळीं ते पुढें म्हणाले, "मला वाटतं एकदां प्रयत्न करून पहावा. ह्या धंद्याची मला कांहीं कल्पना नाहीं. इथं मी जेवायला येतों खरा पण व्यवस्था कशी ठेवली जाते हें मी पाहिलं नाहीं. व्यवस्था ठेवणं म्हणजे काय करणं, याचा देखील मला अजून अंदाज येत नाहीं. अशा परिस्थितींत मला नोकरी द्यावी असं तुम्हांला वाटतं का?"

त्यांचं भाषण अगदीं ओशाळवाण्या पद्धतीनं चाललं होतं. मला त्यांची कींव आली. आई काय उत्तर देते याकडे माझं लक्ष होतं. माझ्या आणि तिच्या विचारांत फरक पडता तर—पण तशी वेळ आली नाहीं.

आई म्हणाली, "व्यवस्था ठेवणं म्हणजे तसं पाहिलं तर कठीण नाहीं—पण बारकाईनं विचार केला तर तितकंसं सोपं नाहीं. हजार प्रकारचीं हजार माणसं इथं येतात. प्रत्येकाच्या तक्रारी वेगवेगळ्या. प्रत्येकाच्या संवई वेगवेगळ्या. अशा साऱ्या माणसांशीं त्यांचीं मनं न दुखवतां वागायचं म्हणजे एकंदरींत बिकट काम आहे. त्याला थोडा अनुभव लागतो. पण डोकं शांत ठेवलं, शब्द गोड ठेवला नि अविचार केला नाहीं म्हणजे त्यांत मुळींच कांहीं कठीण नाहीं. पण

एवढं एक मात्र झालं पाहिजे—वेणू म्हणाली तेंच खरं—तुम्ही चार सहा दिवस नुसतं पहात जा. त्यावरून तुम्हांला अंदाज येईल. ”

बाळासाहेब अस्वस्थ झाल्यासारखे दिसले. कामाचं जोखीम त्यांना कळत असावं म्हणूनच ते विचारांत पडले. आई पुढं म्हणाली, “ कां? विचारांतसे पडलांत ? ”

“ तसं कांहीं नाहीं ” बाळासाहेब म्हणाले, “ कुठं तरी नोकरी करायची हें जेव्हां ठरलं, तेव्हां ती नोकरी कशी करायची हें सांगायला भिऊन कांहीं चालणार नाहीं. सर्कशींत मी कांहीं दिवस घालवले आहेत. वाघ, सिंह आणि अस्वलं यांच्याही सहवासांत राहिलों आहें. तेव्हां इथं तितकंसं कठीण जाईल असं वाटत नाहीं. ”

बाळासाहेबांच्या त्या भाषणाला आई हंसली आणि म्हणाली, “ वाघ सिंहांना वागवणं सोपं पण हीं माणसं फार कठीण—त्यांतून भूकाळु माणसं तर फारच कठीण. कशा एकेकाच्या एकेक तक्रारी असतात याची कल्पना तुम्हांला यायची नाहीं. हें हजारों माणसांचं कुटुंब, मी आज इतकीं वर्षं चालवितें आहें. कुटुंबांत चार माणसं असलीं, तर माणूस कातावून जातं. चार मुलं हट्ट करूं लागलीं तर आदळ आपट करतात. इथं का आदळ आपट करून भागणार आहे? एक शब्द वांकडा गेला तर माणसं चुटकीसरशीं निघून जातील. या मोठमोठ्या खाणावळी चालल्या आहेत—पण तिकडे न जातां माझ्या खाणावळींत एवढीं माणसं येतात, तीं कां, एवढं नीट लक्ष लावून पहा म्हणजे झालं—”

त्या दिवसापासून बाळासाहेब जवळ जवळ कामावर रुजू झाले. पैसे देण्याघेण्याच्या कामावर दोन कारकून होते. ते आईच्या हाताखालीं काम करायला नाराज नव्हते. पण हा कुणी बाहेरचा माणूस मॅनेजर म्हणून येतो आहे हें जेव्हां त्यांना कळलं, तेव्हां त्यांच्यांत चुळबुळ सुरू झाली.

बाळासाहेब निर्बुद्ध नव्हते. आठ दिवसपर्यंत त्यांनीं सारखं निरीक्षण

चालवलं होतं. आठ दिवसांनंतर आईनं चार्ज सोडला आणि बाळासाहेब व्यवस्था पाहूं लागले.

कारकुनांच्या कारवाया सुरू झाल्या. जेवायला येणाऱ्या लोकांना चिथावणी द्यायची त्यांनीं सुरवात केली. उगीचच खुचपटं काढून लोक बाळासाहेबांशीं भांडण करूं लागले. मिळालेला उपदेश पूर्णपणें अमलांत आणण्याची बाळासाहेबांनीं तयारी ठेवली होती, असं त्यांच्या वर्तनावरून दिसलं. कुणी कांहीं बोललं तरी त्याच्या उलट उत्तर म्हणून करायचं नाहीं, अगदीं तोंडांत खडीसाखर ठेवल्यासारखं बोलायचं, अशी शिस्त ठेवल्यामुळं त्या कारवायांना कांहीं यश आलं नाहीं.

आईला विश्रान्ती मिळूं लागली आणि तेवढ्यामुळंच तिला माझ्या योजनेबद्दल अभिमान वाटला. पन्नास रुपये मॅनेजरला देणं म्हणजे तिच्या हातचा मळ होता. दानधर्माला देखील पन्नास रुपये ती सहज काढून देत असे. सत्तेच्या नोकराला पन्नास रुपये पगार द्यायला तिला मुळींच कठीण गेलं नाहीं. पुन्हां पुन्हां तिला वाईट वाटे, तें एकाच गोष्टीबद्दल. ती मला म्हणे, "देवाच्या घरीं हें कसं रुजू होईल हें कांहीं मला कळत नाहीं. आम्हीं त्यांच्या घरीं नोकर होतों. खरं पाहिलं तर त्यांच्याच भांडवलावर हा धंदा उभारला आहे. अगदीं तोंडदेखलं बोलायचं म्हणून नव्हे—पण या खाणावळीची मालकीच जिथं त्यांची आहे, तिथं त्यांना दरमहा पन्नास रुपये दिले म्हणजे कांहीं मोठंसं झालं असं नाहीं. तूं पन्नास रुपयेच का म्हटलेस ?"

आईच्या त्या भाषणाचं मला हंसूं आलं. "कां?" मी म्हटलं, "तुझ्या मनांत जास्त द्यायचे होते का ? जास्त देणं तुला अशक्य नाहीं हें मला माहीत आहे; पण कुणा माणसाला केव्हां आणि किती पैसे द्यावे, हें ठरवावं लागतं. पन्नास रुपये देखील देऊं नयेत असं पहिल्यानदा माझ्या मनांत होतं. इथं जेवणं फुकट मिळतं आहे, रहायला जागा फुकट आहे. बाळासाहेबांसारख्यांच्या हातांत पन्नास रुपये खेळूं देणं देखील

इष्ट नाहीं. पण अगदींच वाईट दिसेतं म्हणून मी पन्नासाचा आंकडा सांगितला."

आई माझी पाठ थोपटून म्हणाली, "आतां मला कांहीं भीति वाटत नाहीं. आतां मी मेलें गेलें, तरी माझी खाणावळ कांहीं बंद होणार नाहीं."

आईच्या उद्गारांचं मला कौतुक वाटलं. मी बी. ए.; एम्. ए. होण्याचीं स्वप्नं बाळगून बसलें होतें आणि मी तिची खाणावळ चालवीन म्हणून आई अपेक्षा करीत होती !

थोडासा विचार करून मी पाहिला—त्यावेळीं मला वाटलं, बी. ए.; एम्. ए. होऊन तरी मी काय ध्वजा लावणार? चांगलंसं लिहितां येत नाहीं तरी सुद्धां हा धंदा आईनं एवढ्या मोठ्या प्रमाणांत चालवला. जागेचं भाडं दोनशें रुपये होतं. महिन्यांत चांगला दहा हजारांचा व्यवहार होत असे. एव्हढा मोठा धंदा चालवणारे पुरुष तरी कितीसे आहेत? अभिमानासाठीं म्हणून बी. ए. व्हायचं पण आईचाच धंदा पुढं चालवायचा, असा मी त्याचवेळीं मनाशीं निश्चय केला.

बाळासाहेबांना मॅनेजर नेमल्यापासून कुत्साकुमारी चवताळली होती. भर पंगतीवर वाटेल तशीं अचकट विचकट विधानं करून माझी टवाळी करणं, हा आमच्याच घरीं जेवणारांचा विषय होऊन बसला होता. शाळेंत देखील बाजूबाजूनं माझ्या कानांवर अशाच गोष्टी येत. पण ऐकायला मला फुरसत नव्हती. माझी परीक्षा जवळ आली होती. नापास व्हायचं नाहीं असा मी निश्चय केला होता. हल्लीं मी वाढायलाही फारशी जात नसें.

मी वाढायला जात नसें ती मी अभ्यासांत गुंतून रहात असें म्हणून. पण त्याचाही विपर्यास करण्यांत येत होता. कुणी कांहीं बोललं तरी त्याच्याकडे दुर्लक्ष करायचं, अशी मी प्रतिज्ञा केली होती.

एकदांची परीक्षा झाली नि मला हायसं वाटलं. रिझल्ट लागायला

अवकाश होता म्हणून कुठं तरी बाहेरगांवीं जावं असा विचार केला. आई म्हणाली 'कोंकणांत गांवीं जावं' तर सुलोचना पुण्याला बोलावित होती. कोंकणांत जायचं तर आईबरोबरच गेलं पाहिजे होतं नि आई गेली असती तर खाणावळीची व्यवस्था कशी राहिली असती हें खात्रीनं सांगतां आलं नसतं.

बाळासाहेब पूर्ण सहनशीलपणानं जरी वागत होते, कुणाची कांहीं तक्रार येऊं देत नव्हते, तरी समोर आई उभी होती म्हणूनच हें सारं होत होतं. आईच्या गैरहजरींत त्या टवाळ लोकानीं बाळासाहेबांना कसं सतावलं असतं हें कांहीं सांगतां आलं नसतं.

मी सुलोचनेबरोबर पुण्याला निघून गेलें.

मुंबई सोडण्याचा माझा पहिलाच प्रसंग होता. इवलंसं माझं आयुष्य पण तें सारं मुंबईतच गेलं होतं. कोंकणच्या लहानपणच्या आठवणी आतां जवळ जवळ स्वप्नासारख्या वाटत होत्या. मुंबईबाहेर जग आहे याची मला कल्पनासुद्धां नव्हती. इतिहास भूगोलांतून गांवांचीं नांवं वाचलीं म्हणजे मनांत येई, कीं हीं असलीं गांवं एकदां पाहून यावं. पुरुष असतें तर गेलें असतें देखील. इतक्यांत चांगली दहा वेळां जाऊन आलें असतें.

मी सुलोचनेबरोबर जायला निघालें तेव्हा आई म्हणाली, " पुण्याला जाते आहेस पण सांभाळून रहा. जग हें इथून तिथून सारखंच आहे. इथं जशी टवाळ माणसं आहेत तशीं तिथंही आहेत. दुसरी कुणी आई असती तर तिनं आपल्या मुलीला पाठवलंसुद्धां नसतं—पण मला कांहीं तसली भीति वाटत नाहीं. कां वाटावी! एवढ्या मोठ्या मुली, या एवढ्या वाढतात म्हणून त्यांना मुली म्हणायचं—पण आमच्या जुन्याकाळच्या हिशेबीं पाहिलं तर तुला कुणी मुलगी म्हटलं नसतं. माझीच गोष्ट घे, तूं झालीस त्यावेळीं मी चौदा वर्षांची होतें. तुम्हां मुलींना हें सांगून सुद्धां खरं वाटायचं नाहीं. अकराव्या वर्षी माझं लग्न झालं. हल्लीं

दिसते आहे का कुणी अकरा वर्षांची मुलगी लग्न झालेली ? बाराव्या वर्षापासून माझ्या आंगावर प्रपंच पडला नि चौदाव्या वर्षी मी आई झालें. आई झाली, कीं मुलगी कांहीं लहान रहात नाहीं. तुला तरी आतां, मला वाटतं, हें सतरावं वरीस. या तुझ्या वयांत मी उघडी पडलें. संसार संपून गेला. त्यानंतरचे दिवस किती कष्टांत काढले हें कशाला आतां तुला सांगूं ! तूं तेव्हां लहान होतीस म्हणूनच बरं होतं. कांहीं कळत नव्हतं तुला. पण एक बरं होतं, कीं लहानपणीं तुझा स्वभाव हट्टी नव्हता. तसं असतं तर मला कुठंतरी जाऊन जीव द्यावा लागला असता. अजूनही तसाच राहिला आहे—इतके दिवस कधीं बोललें नव्हतें पण आज बोलण्याची वेळ आली म्हणून सांगतें, तूं ही अशी होतीस म्हणूनच माझ्या हातून हा एवढा धंदा झाला. कसा छळ करीत होते लोक माझा, तें तुला सांगून सुद्धां कळायचं नाहीं. जसजसं मला यश येत होतं तसतसा माझा छळ वाढत होता. तुला कांहीं कळूं देत नव्हतें. माझं दुःख माझ्या पुरतं. तुला कशाला दुःखांत वाटेकरी करूं ? अजूनही कांहीं कमी छळ होतो आहे असं नाहीं पण आतां तें अंगवळणीं पडलं आहे. कांहीं वाटत नाहीं त्याचं. तेव्हां म्हणतें, एकदां बाहेरची हवा पाहून ये. कोंकणांत गेलों असतों आपण तर बरं झालं असतं पण तूं नको म्हणतेस—फार जावंसं वाटतं मला, जुन्या माणसांना एकदां भेटून आलें असतें—" मी हंसतें आहें असं पाहून आई म्हणाली, "हंसतेस कां ? श्रीमंती आली आहे ती मिरवायला जातें, असं का वाटलं तुला ? अगदीं तेवढ्याचसाठीं कांहीं नव्हे पण लोभा-लाभाचीं माणसं असतात त्यांना आपल्या चांगल्या दिवसांत तरी भेटल्या-शिवाय राहूं नये. काय सांगावं ? केव्हां कसा प्रसंग येईल तो. मिरवायला म्हणून नव्हे—पण चांगलं चाललं आहे तोपर्यंत केव्हांतरी एकदां गांवीं जाऊन आलं पाहिजे—"

साऱ्या आयुष्यांत आई पहिल्यानं मागल्या हकिकती माझ्याकडे बोलली. मला वाटलं, हा वेळपर्यंत बोलायला तिला फुरसतच झाली नव्हती.

बोलावं असं वाटण्याइतकी विश्रांती तिच्या आयुष्यांत कधींच मिळाली नव्हती. बाळासाहेब आल्यापासून नुसती चुटपुटती नजर ठेवण्यापलिकडे ती व्यवहाराकडे फारसं पाहात नसे. बाळासाहेबांनींही आपली नोकरी चोख बजावण्याचा उपक्रम केला होता. मला वाटलं, बाळासाहेबांच्या स्वभावांत फरक पडला. 'अंगावर जोखीम पडलं म्हणजे माणूस आपोआप वळणावर येतं' असं म्हणतात—त्याचा प्रत्यय आला. शक्य तेव्हढं करून बाळासाहेबांच्या कारभारांत एकसुद्धां शब्द न टाकण्याचा आईनं प्रघात ठेवला होता. अगदीं तिच्यापर्यंत तक्रार आली तरच ती तोंड घालीत असे. असं असल्यामुळं बाळा-साहेबही सदा सावध असत.

आतां सर्व कांहीं सुरळीत चाललं होतं; अशी खात्री झाल्यामुळं मी सुलोचनेबरोबर पुण्याला निघून गेलें. चांगली सहा आठवडे तिथं होतें. परीक्षेचा रिझल्ट लागायच्या आधीं थोडे दिवस मुंबईला आलें.

पुण्याला गेलें तेव्हां पहिल्या पहिल्यानं वातावरण बदलल्यानं जरा बर वाटलं. पण पुढं कंटाळा येऊं लागला. गजबजलेल्या घरांत राहण्याची संवय, चार-दोन माणसांच्या घरांत ज्यावेळीं राहावं लागलं त्यावेळीं अगदीं ओकं ओकं वाटूं लागलं.

आम्ही सुलोचनेच्या चुलत्याकडे गेलों होतों. त्यांना कसलीशी नोकरी होती सरकारी. घरीं तीन चार माणसं होतीं, तरी मुलाबाळांचं लेंढार मात्र बरंच होतं. तीं अशी किरकिरीं मुलं होतीं, कीं कांहीं सांगतां सोय नाहीं. दिवस उजाडल्यापासून रात्रीं झोपीं जाईपर्यंत सारखी रडा-रड, मारामाऱ्या चालल्या असत. सुलोचनेच्या चुलतीला तीं मुलं कांहीं आवरत नसत. तिचे चुलतेही विक्षिप्त होते. तेही आल्याबरोबर मुलांना मारायचा सपाटा सुरू करीत असत, त्यामुळं माझा जीव कातावून गेला नि म्हणूनच मुंबईला आलें तेव्हां मला हायसं वाटलं.

रिझल्ट लागला नि मी पास झालें.

## प्रकरण १०

## मी सावध झालें

मी कॉलेजांत जाऊं लागल्या पासून माझी थट्टा करणाऱ्यांना ऊतच येऊं लागला. कॉलेजांतल्या मुली माझ्याबद्दल कांहीं सहानुभूती बाळगतील अशी माझी अपेक्षा होती पण ती खोटी ठरली. जातिभेदाबद्दल चोहोंकडे ओरड केली जाते; पण एका जातीचीं माणसं देखील, केवळ खाणावळवालीची मुलगी आहे म्हणून, माझी हेटाळणी करूं लागलीं. —विशेषतः ज्या मुली पदवीधर होण्याच्या अगदीं बेताला आल्या होत्या—त्या मुलींसुद्धां माझी हेटाळणी करूं लागल्या, हें पाहून मला आश्चर्य वाटलं.

शिक्षणानं मन सुसंस्कृत होतं, मनोभूमिकेचा दर्जा उच्च होतो, पाहाण्याची दृष्टि व्यापक होते, अशी माझी कल्पना होती ती फोल ठरली. शिक्षणाच्या परिणामाबद्दलचा माझा विश्वास डळमळूं लागला. खाणावळींतील लोकांनीं माझी थट्टा केली तरी त्याबद्दल मला कांहीं वाटत नसे. बोलून चालून उनाड लोक. कुटुंबवत्सल नसलेलीं माणसंच बहुतेक खाणावळींत येतात. तेव्हां त्यांची वृत्ति तशी असली तर त्यांत कांहीं आश्चर्य नव्हतं.

मी त्याला उपाय केला होता. कॉलेजांत जाऊं लागल्यापासून मी संध्याकाळच्या वाढण्याच्या कामांतला बराचसा भाग मुद्दाम होऊन

माझ्या अंगावर घेतला होता. काहीं दिवसपर्यंत हा उपाय चांगला लागू पडला असं मला वाटलं. पण त्यांतही फाटे फुटूं लागले.

एक दिवस एक कॉलेजांतला विद्यार्थी पंगतीवर म्हणाला, "ही मोठी गंमत आहे बुवा. यापूर्वी आमच्या वेणूताई फारशा वाढायला येत नसत पण बाळासाहेब मॅनेजर झाल्यापासून—विशेषतः आतां त्यांच्या मॅनेज-रीचं बस्तान चांगलं बसल्यापासून–वाढण्याची परीक्षा देण्यासाठीं कीं काय कोण जाणे, त्यांनीं हल्लीं वाढायचा नित्यक्रम सुरू केला आहे."

दुसरा उद्गारला, " अरे चुकतोस गोविंदा, वाढलेल्या मुलींनी वाढा-यचं नाहीं तर मग वाढायचं कुणीं ? "

"ही कोटी झाली वाटतं ?" पहिला उद्गारला, "फार वाढलं आहे हल्लीं हे कोटया करण्याचं वेड–विशेषतः असल्या खजाळ कोटया करण्याचं. मी अगदीं गंभीरपणं चर्चा करीत होतों त्याच्यावर पाणी ओतलंस—".

हातांतलं भाडं त्याच्या पानांत ओतून रागानं निघून जावं असं मला वाटत होतं. पण मी आत्मसंयमन केलं नि वाढतांना हंसून म्हटलं, " तुम्हीं अगदीं नवीन येतां वाटतं इथं, गोविंदराव ? "

गोविंदराव बेडरपणें म्हणाले, " नवीन कां ? आज चांगला तीन वर्षं येतों आहें. "

" मग मी पूर्वीपासून वाढीत असतें याची आठवण बुजाली वाटतं ? परीक्षेच्या अभ्यासाच्या वेळीं माणसाला थोडी मेहनत करावी लागते हें तुमच्यासारख्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या तरी ध्यानीं आलं पाहिजे होतं. "

मी अगदीं शांतपणें बोलत होतें. यत्किंचितही चिडल्यासारखं दाखवलं नाहीं त्यामुळें तो गृहस्थ ओशाळला.

कांहीं दिवसपर्यंत पंगतीवरची थट्टा बंद झाली, पण एक पंगत थोडीच होती ! या ना त्या पंगतीवर अशीच कुणी ना कुणी कांहीं तरी खजाळी चालवीत असत.

बाळासाहेबांच्या वृत्तींत हल्लीं फरक पडत चालला होता. त्यांची राहणी बरीच बदलली होती. पूर्वीचा गबाळेपणा जाऊन जरा ठाकठीक नि नीटनेटकं राहण्याचा उपक्रम त्यांनीं सुरू केला होता. संध्याकाळीं फिरायला जातांना बाळासाहेब अगदी अप्-टु डेट ड्रेस करून जात असत. त्याचं जरी मला कांहीं वाटलं नाहीं, तरी त्यांच्या खोलींत एक दिवस मी गेलें असतां टॉयलेटच्या जिनसांची जी लयलूट झालेली दिसून आली ती पाहून मला एकंदरींत बरं वाटलं नाहीं. मी खोलींतून बाहेर पडायला आणि बाळासाहेब तिथं यायला गांठ पडली. मी जरा ओशाळल्यासारखीच झालें. त्या माझ्या ओशाळण्याचा त्यांनी विपरीत अर्थ केला असावा. ते म्हणाले, " काय पाहात होतां वेणूबाई—? "

मी दचकलें. यापूर्वी ' वेणूताई ' म्हणणारा गृहस्थ आज ' वेणूबाई ' कां म्हणतो ? मलाही तसंच उत्तर देण्याची लहर आली. मी म्हटलं, " कांहीं नाहीं; नुसती तुमच्या खोलीची पाहाणी करीत होतें बाळाभाऊ ! "

" बाळाभाऊ ? " बाळासाहेब उद्गारले.

" वेणूबाई ? " मी जरा खोंचून म्हटलं.

"मग काय आढळून आलं त्या पाहाणींत ?" बाळासाहेबांनीं विचारलं.

मधले दोन उद्गार तसेच राहून गेले. मी बाळाभाऊ कां म्हटलं नि त्यांनीं वेणूबाई कां म्हटलं, याचं निराकरण व्हायचं राहून गेलं.

" पाहाणींत बरंच दिसून आलं. " मी खोंचून बोललें, " तुमच्या थाटांत बराच फरक होतो आहे. हीं क्रीम्स, ब्रश, कंगवे, ब्रिलियंटाइन्स वगैरे वगैरे बऱ्याच नव्या जिनसा आल्या आहेत. नि एक प्रकारच्या नाहींत, चार चार प्रकारच्या क्रीम्स, तीन चार प्रकारचीं ब्रिलियंटाइन्स, फेसपावडर्स, असा हा पोरीबाळींना शोभणारा थाट तुमच्या खोलींत कां ? "

" कोणत्या नात्यानं तुम्हीं हा प्रश्न करीत आहांत ? " बाळासाहेबांनीं विचारलें.

" मी प्रश्न करीत नाहीं. तुमच्या प्रश्नाला मी उत्तर दिलं. "

" उत्तर दिलंत खरं—पण त्याबरोबर प्रश्न केलातच कीं. वेणूबाई, मी तरुण माणूस आहें—सर्कशींत राहिल्यामुळं यूरोपियन माणसांशीं देखील माझा संबंध आला आहे. त्यांचं अनुकरण करण्याची मला तिथं सवय लागली होती. तिथं ज्या वेळीं मी मॅनेजर म्हणून मिरवत होतों त्यावेळीं असल्या साहेबी थाटांत मला राहावं लागत होतं. मधले दुःखाचे दिवस आले त्यावेळीं फाटक्या धोतर–कोटावर भागवीत होतों; पण आतां चार पैसे हातीं आल्यावर मी दुःखांत दिवस कां काढावे ? "

" असं काय सुख आहे या वस्तूंपासून ? पोषाख करा, चांगले उंची कोट हवे तर करा—पण या क्रीम्स नि फेसपावडर्सवर जो पैसा खर्च करतां, त्याच्या वाचून काय अडलं आहे. ? "

बोलतां बोलतां माझा आवाज चढा झालेला पाहून बाळासाहेब स्तब्ध झाले. घरच्या एकाद्या वडील माणसानं घरांतल्या एकाद्या विद्यार्थी मुलाला जसं अधिकारानं बोलावं, तसा माझ्या नकळत माझा स्वर बदलत जात होता. मला हें कळलं, पण अंतःकरणांतली भावना मला आवरतां आली नाहीं.

" तुम्हाला आवडत नाहीं का ? "

" माझ्या आवडीचा काय संबंध आहे ? "

" कां बरं—मी तुमचा नोकर आहें. तुम्हांला आवडत नाहींत त्या गोष्टी करणं माझ्या हिताचं होणार नाहीं, याची मला पूर्ण जाणीव आहे. तुम्हाला आवडत नसेल तर उद्यांपासून हें सारं रंगरोगण बंद करतों. "

" तुमचे तुम्ही मुखत्यार आहांत. काय वाटेल तें करा " असं म्हणून मी खोलीच्या बाहेर गेलें.

मी माझ्या खोलींत जाऊन आरामखुर्चीवर पडलें होतें, इतक्यांत बाळासाहेब तिथं आलें. ते आले हें जरी मला कळलं तरीही मी न

कळल्याचा आव आणून पुस्तक वाचीत बसलें होतें. बाळासाहेबांनीं एकदां खाकरून खोकरून पाहिलं.

आतां ढोंग चालू ठेवणं शक्य नव्हतं म्हणून मी वर पाहिलं आणि म्हटलं, " कोण बाळासाहेब ! काय आहे ? "

बाळासाहेबांनीं शेजारची खुर्ची पुढं ओढली आणि बसतां बसतां ते म्हणाले, " माफ करा--तुमच्या अभ्यासांत मी व्यत्यय केला–पण कांहीं कांहीं संवयी माणसाला लागलेल्या असतात त्या कांहीं तोडतां येत नाहींत. तुम्हांला वाटत नाहीं असं ? "

" माझ्या वाटण्याचा काय संबंध ? तुम्हीं जोंपर्यंत आपलं काम चोख बजावतां तोंपर्यंत तुम्हीं कुठलीं क्रीम्स लावतां, कीं कुठलीं ब्रिलियंटाइन्स वापरतां कीं न वापरतां, हें पाहण्याची मला जरुरी नाहीं. "

"तें खरं आहे" बाळासाहेब म्हणाले, "पण तुम्हांला रुचत नाहीं ती गोष्ट मी करणं वाजवी होणार नाहीं, इतकं कळण्याइतकी मला अक्कल आहे. त्यांतूनही विशेषतः तुमचं–म्हणजे वेणूबाई प्रत्यक्ष तुमचं—मनही माझ्याबद्दल बिघडावं असं मला केव्हांही वाटणार नाहीं. "

" बरं मी असं विचारतें; आजपर्यंत तुम्हीं मला वेणूताई म्हणत होतां नि आज तुम्हांला ही वेणूबाई म्हणायची लहर कुठून आली ? "

अगदीं नाजुक हंसून बाळासाहेब म्हणाले, "तें असं आहे. आजपर्यंत मला ही जाणीव नव्हती. अगदीं पूर्वीच्या पद्धतीनं बोलायचं म्हणजे मी नुसतं वेणूच म्हटलं पाहिजे होतं. पण इथं लोक वेणूताई म्हणत आहेत तें ऐकलं, म्हणून तसं म्हणत राहिलों. पण हल्लीं मला आठवण होऊं लागली, कीं तुम्हीं मालक आहांत नि मी नोकर आहें. तो दर्जा बाळगला पाहिजे म्हणून नित्याचं विशेषण टाकून चांगली शोभेल अशीच हांक मारायचं ठरवलं. "

मी कांहीं न बोलतां स्वस्थ राहिलें. बाळासाहेब सारखे माझ्याकडे पाहात होते. त्यांच्या नजरेंत जो चंचलपणा आला होता तो पाहून

क्षणभर मला भय वाटलं. त्यांचे अंगविक्षेप असे कांहीं चमत्कारिक होत होते, कीं चटकन ते पुढं होऊन माझा हात धरतील कीं काय, अशी भीति मला वाटली. विजेसारखी ही कल्पना माझ्या मनांतून चमकून गेली.

बाळासाहेब जात नाहींत असं वाटून मी म्हटलं, " कांहीं काम आहे का ? "

" नाहीं, नाहीं, " बाळासाहेब चांचरत उद्गारले, " बसलों इथं क्षणभर तर तुमची हरकत आहे का ? तुम्हीं इतका परकेपणा बाळगला नाहीं म्हणून म्हणतों–एकटंच तिथं खोलींत बसायचं, जेवणारे यायला अजून अवकाश आहे, तेव्हां म्हटलं घटकाभर इथं बोलत बसेन, एव्हढंच. "

मी पुस्तक उचलून हातीं घेतलं आणि म्हटलं, " मला अभ्यास करायचा आहे. मग मला वेळ व्हायचा नाहीं. वाढायला जायचं आहे ना ! "

" कशाला तुम्हीं वाढतां नि लोकांच्या टीकेला कारणीभूत होतां ! काय वाढपी नाहीं आहेत ! कामं सगळीं सुरळीत चाललीं आहेत. मधें तुम्हीं अभ्यासांत होतां त्यावेळीं तुम्हीं वाढीत नव्हतां, म्हणून कुठं अडलं ! मला वाटतं, हें वाढप्याचं काम करणं तुम्हीं आतां बंद करावं. आपलं मी सुचवतों आहे एव्हढंच. बाकी तुमच्या तुम्हीं मुखत्यार आहांत. काय बरं, काय वाईट, हें तुमचं तुम्हाला चांगलं कळतं आहे—" मी कांहींच उत्तर देत नाहीं असं पाहून " बरं येतों तर " असं म्हणून बाळासाहेब निघून गेले.

त्या दिवसापासून मी बाळासाहेबांच्या बाबतींत चांगलीच सावध राहाण्याचा निश्चय केला.

# प्रकरण ११

## मी इन्स्पेक्टर बनलें

त्या दिवसापासून बाळासाहेबही माझ्या बाबतींत फार सावध राहूं लागले. माझ्या वर्तनांत मी कोणत्याही प्रकारें फरक होऊं दिला नाहीं. अगदीं थोडासा फरक जरी दिसला असता तरी खाणावळींतील काकदृष्टि लोकांच्या नजरेंत तो चट्कन भरला असता, नि आधींच माझी बद-नामी करण्यासाठीं टपलेल्या त्या लोकांच्या हातीं चांगलंच हत्यार मिळालं असतं.

बाळासाहेबांशीं ज्या प्रकारें मी पूर्वी बोलत असें–तशीच बोलत होतें, जसे हुकूम द्यायचे तसेच देत होतें, वेळप्रसंगीं चापणं किंवा तंबी देणं पूर्वीप्रमाणंच सुरू होतं.

बाळासाहेबांना मॅनेजर नेमल्यापासून आई खाणावळीच्या व्यवहारा-कडे पूर्वीइतकी लक्ष देत नसे. मधून मधून यायचं, जुन्या ओळखीच्या माणसाशीं चार खुशालीच्या गोष्टी बोलायच्या, कुणीं बिलं दिलीं नस-तील त्यांना सामदामाचे दोन शब्द ऐकवायचे, यापलीकडे आई फारसं काम करीत नसे. दिवाणजी सर्व हिशेब ठेवीत असत. आईला जरी जमाखर्चाच्या पद्धतीची शिस्तवार माहिती नव्हती तरीही दिवाणजींनीं सांगितलेल्या हिशेबांवरून आदा नि खर्च तिच्या चांगलाच लक्षांत येत असे. हल्लीं कांहीं महिने हिशेब तपासण्याचं काम तिनं माझ्यावर सोपवलं होतं—म्हणजे ती माझ्यावर सर्वस्वीं अवलंबून असे अस

नाहीं—तर पहिल्यानं हिशेब मी तपासायचे नि नंतर तिला ते समजावून द्यायचे, नि मग शेवटचा शेरा तिनं मारायचा.

चालू महिन्याच्या हिशेबानं दिवाणजी अस्वस्थ झाले होते. महिन्यावर यणाऱ्या लोकांचा हिशेब बरोबर होता. पण दररोज किरकोळीनं जेवायला येणाऱ्या माणसांच्या हिशेबांत कांहींतरी अफरातफर होते आहे असा संशय आल्याचं दिवाणजींनीं मला सांगितलं. ही गोष्ट आम्हीं आंईपर्यंत जाऊं दिली नाहीं. पण आम्हीच तपासाला सुरवात केली.

कॉलेजचे दोन तीन दिवस बुडालं तर फारसं नुकसान होण्याजोगं नव्हतं म्हणून मी गैरहजर राहून नजर ठेवण्याचं ठरवलं. मी गैरहजर राहिलें याचा थांगपत्ता बाळासाहेबांना लागूं दिला नव्हता. दिवाणजी या कामीं मला मदत करीत होते. वेळेवारी जेवायला येणारीं माणसं किती आहेत नि रोखीचे पैसे किती येतात, एवढंच भी पाहाणार होतें. रविवारीं मी नजर ठेवून पाहिली होती पण त्या दिवशीं एक पैचीसुद्धां चूक सांपडून आली नव्हती म्हणूनच मला असं करावं लागलं.

दिवाणजींचा संशय खरा होता. अफरातफर होत होती नि तीही चांगली व्यवस्थितपणें. किरकोळीनं जेवायला येणारीं माणसं इतकीं होतीं, कीं रोज चार पांच रुपये घटवणं कांहीं अशक्य नव्हतं—नि तसंच होत होतं. तीन दिवसपर्यंत मी पाळथ ठेवली नि खात्री करून घेतल्यावर पुन्हां तीन चार दिवस पूर्वीप्रमाणें चालूं दिलं.

चोरी करतांना बाळासाहेबांना पकडण्याचं माझ्या मोठं जिवावर आलं होतं. चारचौघांसमक्ष तर राहोच पण नुसत्या दिवाणजींसमक्ष देखील ते पकडले जावे, हे मला बरं वाटत नव्हतं. दिवाणजींना मी त्या दिवशीं गैरहजर राहायला सांगितलं नि मी दिवाणजींच्या कामावर बसलें. कॅशवर मी बसलेली पाहून बाळासाहेब हंसत हंसत म्हणाले, "वाः तुम्हीं आतां हें काम देखील करूं लागलांत वाटतं. !"

मीही तसंच हंसत उत्तर दिलं, "पडेल तें काम नको का करायला?

दोन दिवसांच्या रजेसाठीं बदली माणूस ठेवणं दिवाणजींनांही शक्य नव्हतं नि मलाही जरूरी वाटली नाहीं."

"मग मी नसतं का केलं तें काम?" बाळासाहेबांनीं विचारलं.

"सर्व कामं शिस्तीप्रमाणं झालीं पाहिजेत," मी म्हटलं, "बुडालं एक दोन दिवस कॉलेज तर फारसं कांहीं नुकसान होत नाहीं—नि मलाही म्हटलं एकदां हें काम समजेल."

त्यादिवशीं हिशेबांत अफरातफर झाली नाहीं; पण दुसऱ्या दिवशीं बाळासाहेबांना मोह आवरतां आला नाहीं. मला संशय आहे—त्यादिवशीं त्यांनीं दोन-तीन माणसांच्या पैशांच्या बाबतींत हातचलाखी केली असावी. पण मला खात्री नव्हती. मात्र दुसऱ्या दिवशीं लबाडी बरोबर उघडकीस आली.

बाळासाहेबांची हातचलाखी मला कळली आहे असं मी त्यांना दिसूं दिलं नाहीं. जितकी मी गैरमाहिती दाखवण्याचा प्रयत्न करीत होतें तितके ते फसत होते. मला वाटलं, ते डाव टाकून पाहात होते. मी अगदीं वेड्याचं सोंग घेतलं होतं. हिशेबांत मला कांहीं कळत नाहीं; बाळासाहेब म्हणतील तें खरं—ते म्हणतील तसा हिशेब मी लिहून घेतें आहें—अशी जसजशी त्यांची खात्री होऊं लागली तसतशी त्यांची हातचलाखी वाढूं लागली, नि त्या दिवशीं त्यांनीं सहा रुपये बारा आणे चोरले.

दुपारीं सगळी आवराआवर झाल्यावर बाळासाहेब आपल्या खोलींत आराम करीत होते. मी गड्याकरवीं त्यांना बोलावणं पाठवलं. माझ्या खोलींत पाऊल टाकतांना ते अगदीं हंसतमुखानं आले. त्यांनीं कांहीं तरी निराळाच कयास बांधला असावा असं त्यांच्या मुद्रेवरून दिसून आलं.

"कां बोलावणं झालं?" तें हंसतं हंसत म्हणाले—त्यांच्या हाताकडे माझी नजर गेली, सोन्याची साखळी असलेलं सोन्याचं रिस्टवॉच त्यांच्या हातांत झळकत होतं.

मी म्हटलं, " वाः हें घड्याळ केव्हां घेतलंत ? "

"हें घड्याळ होय!" बाळासाहेब जरा चांचरतच म्हणाले, " जुनंच आहे तें-बाबांच्या वेळचं. पडून राहिलं होतं ट्रंकेंत. वापरतों आहें झालं. हल्लीं पोषाख थाटामाटांत करतों कीं नाहीं—त्याला शोभेसं घड्याळ हवं कीं हातांत—"

मी टक लावून त्यांच्या चेहेऱ्याकडे पाहात होतें त्यामुळें ते अस्वस्थ झाले नि म्हणाले, " कां ? काय झालं ? "

" तें आपल्या मनालाच विचारा ! " मी म्हटलं.

" मनाला काय विचारायचं ? माझं असंस्कृत मन मला कांहींच सांगत नाहीं. "

" असंस्कृत मनंच निर्मळ असतात. सुसंस्कारानं बुद्धि प्रगल्भ होते; नि मग त्या बुद्धीला हातचलाखीचे खेळ खेळावेसे वाटूं लागतात. नाहीं ? "

बाळासाहेब बावरल्यासारखे झाले. मला कांहींतरी संशय आला आहे अशी अटकळ त्यांनी बांधली असावी. ते म्हणाले. " इतकी प्रौढ भाषा मला कळत नाहीं. मी मूळचा साधारण अशिक्षित-त्यांतून सर्कशीसारख्या गबाळ नि मवाली लोकांत वागलेला-इथं आलों तो खाणावळींत—असली प्रौढ भाषा मला कशी कळावी ? "

" ठीक आहे, " मी खुर्चींत सरसावून बसून म्हटलं, " अगदीं साध्या भाषेंत सांगतें. ऐका. तुम्हाला किती पैशांची जरूरी आहे ? "

" मला पैशांची जरूरी ! ती कशाला ? "

" मी अगदीं सरळ सरळ विचारतें, पन्नास रुपये हा जरी तुमचा पगार असला नि तो तुम्हाला पुरत नसला नि तुम्हाला पैशांची जरूर लागली, तर आईला सांगितलं असतंत तर तिनं कधीं नाहीं म्हटलं नसतं. "

बाळासाहेब फार अस्वस्थ होऊन म्हणाले, " पण मला पैशाची जरूरी लागली असं तुम्हीं कशावरून म्हणतां ? "

मी म्हटलं, " हें पाहा, बाळासाहेब, तुम्हीं माझ्यापेक्षां वयानं मोठे आहांत. तुमच्यासमोर मी एक पोरच आहें. पण आज कित्येक वर्षे आमच्या घरीं हजारांनीं व्यवहार चालला आहे. अगदीं अशिक्षित असलेली माझी आई, बायकोमाणूस असून हे सगळं चालवते आहे. मी तिची मुलगी आहें. मीही कांहीं या व्यवहारापासून पारखी राहिलेली नाहीं. आईकडे मी कांहीं बोललें नाहीं. मला संशय आला म्हणून मी माझी खात्री करून घेतली आहे. तुम्हीं कितीही चुकवाचुकवी करण्याचा प्रयत्न केलात तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. या पेक्षां जास्त स्पष्टपणें बोलायला मला भाग पाडूं नका. "

बाळासाहेब बराच वेळ स्तब्ध बसले. मी सारखी त्यांच्या चेहेऱ्याकडे टक लावून पाहात होतें. त्यांच्या मनांत मोठी खळबळ उडालेली त्यांच्या चेहेऱ्यावर दिसून आल्यावांचून राहिली नाहीं.

एक मोठा सुस्कारा टाकून बाळासाहेब म्हणाले, " असं पाहा वेणू-बाई, मोह मोठा कठीण आहे. मी सर्कशींत होतों त्यावेळीं डोअरवर पैसे खायची संवय मला लागली होती—सर्कशीचा काय किंवा नाटकाचा काय—मॅनेजर म्हटला, कीं तो पैसे खायचाच. त्यानं पैसा खाल्ला नाहीं तर त्याच्या हाताखालचीं माणसं त्याला नाहींसा करून टाकतील. त्या सर्वांचा मोठा कट असतो. ती जुनी आठवण जागी झाली—" बाळा-साहेब तिथंच थांबून थोडा वेळ विचार करून म्हणाले, "ती जुनी संवय जागी झाली. हा प्रकृतिधर्म आहे. तुम्ही माझ्यापेक्षां वयानं लहान आहांत असं तुम्हीं म्हटलंत, पण कांहीं झालं तरी तुम्हीं मालक आहांत. मला वाटतं, झाल्यागेल्या गोष्टी विसरून गेलेलं बरं. सत्यभामाबाईच्या कानावर न जाईल तर यापुढं अशी गोष्ट होणार नाहीं, असं मीं तुम्हाला वचन देतों. पण एव्हढं खरं, मला पन्नास रुपये हल्लीं पुरत नाहींत. तुम्ही मला हिशेब विचाराल पण तो मला देतां यायचा नाहीं. मी चैन करतों आहें यांत शंका नाहीं. पण मी कांहीं वायफळ चैन करीत नाहीं. सर्क-

शींत होतों मी. जगांतलीं सगळ्या प्रकारचीं माणसं सर्कशींत असतात. त्यांच्या सहवासानं कांहीं कांहीं खोडी लागल्या आहेत मला. ही जीभ मोठी कठीण आहे. एकदां चटक लागली जिभेला म्हणजे ती आवरणं मोठं मुष्कील असतं. म्हणजे मी कांहीं व्यसन करतों असं नाहीं; पण कुठल्या-तरी चांगल्याशा हॉटेलांत जाऊन मिलिटरी फूड खाल्याशिवाय मला समाधान वाटत नाहीं. इथलं जेवण चांगलं असतं यांत शंका नाहीं; पण त्यानं माझं समाधान होत नाहीं, म्हणून मधून मधून बाहेर जातों. कॉर्नेलियासारख्या हॉटेलांत जायचं म्हणजे पैसेही तसेच द्यावे लागतात नि केव्हां ओळखीचीं चार माणसं भेटलीं म्हणजे त्यांना नाहीं म्हणतां येत नाहीं. असा या मोहांत सांपडलों आहें मी—"

ते बोलायला चाचरत आहेत असं पाहून त्यांचा उद्देश ओळखून मी म्हटलं, "तुम्हांला पैशांची जरूरी लागेल त्यावेळीं माझ्याकडे मागणी करा. पण त्याला कांहीं मर्यादा पाहिजे. कुठं जाऊन झक मारायची असेल तर एव्हढं करा. दारू पिऊं नका. मी चांगली नजर ठेवीन. दारू प्याय-ल्याचं जर माझ्या नजरेला आलं तर मी काय करीन तें आज सांगत नाहीं.—समजलं ? आज तुम्हीं सहा रुपये बारा आणे चोरलेत ?—"

बाळासाहेब एकदम दचकले, " बरोबर आहे ना माझा हिशेब ? ते ठेवून द्या तुमच्या जवळ आणि पुढं जेव्हां जरूर लागेल तेव्हां माझ्या-कडे मागत चला."

बाळासाहेब आपल्याशींच पुटपुटत होते, " सहा रुपये बारा आणे ! सहा रुपये बारा आणे ! ! "

" कां ? चुकला का माझा हिशेब " ? मी विचारलं.

" इतका बरोबर हिशेब पकडलात म्हणूनच मला आश्चर्य वाटलं ! " बाळासाहेब म्हणाले, " ठीक आहे–आज पासून ठरलं—"

" काय ठरलं ? " मी पुन्हां विचारलं.

" काय ठरलं ! " बाळासाहेब गुळमुळीतपणें उद्गारले.

"काय ठरलं तें मी सांगतें ऐका." मी दरडावून म्हटलं, "तुम्हाला पन्नास रुपये पगार मिळतो—रोज तुम्ही हॉटेलांत गेलांत तरी तुम्हाला दोन रुपयांपेक्षां जास्त पैसे लागणार नाहींत, एव्हढा अंदाज मला आहे. साठ रुपयांत तुमचं भागलं पाहिजे-पण तुम्हांला इतर खर्च आहेत तेंही मी विसरलें नाहीं. माझ्याकडून वेळोवेळीं घेतलेल्या रकमेच्या रूपानं तुम्हाला तीस रुपयांपेक्षां जास्त पैसे मिळणार नाहींत. माझ्या पॉकेटमनीमधून मी हे देणार आहे. समजलं ? यापेक्षां जास्त पैसे द्यायचे म्हणजे मला आईला विचारावं लागेल."

बाळासाहेब अगदीं गर्हिवरून आले. तो गर्हिवर खरा होता, कीं खोटा होता हें मला त्यावेळीं सांगतां आलं नसतं; पण त्याचा माझ्या मनावर परिणाम झाला.

नुसतं 'थँक यू' म्हणून ते माझ्या खोलींतून निघून गेले.

# प्रकरण १२
# मी कॉलेजांत गेलें

सुलोचना माझ्याबरोबरच पास झाली नि माझ्याच कॉलेजांत येऊं लागली. तिची माझी मैत्री पूर्वीप्रमाणेंच कायम होती. पण कॉलेजांत जाऊं लागल्यापासून आणखी एक मैत्रीण मला सांपडली होती. पण ती महाराष्ट्रीय नव्हती. गुजराती होती. तिचं नाव होतं जमनाबेन. तिचा बाप एक कापडाचा मोठा व्यापारी होता.

तीही व्यापाऱ्याची मुलगी असल्यामुळं माझ्याबद्दल तिचा विरोध नसे. सुलोचनेनं पूर्वीचं नातं प्रामाणिकपणानं चालवलं होतं—पण जमनाबेनची आणि माझी जी मैत्री जुळली ती मी महाराष्ट्रीय असून धंदेवाइकाची मुलगी होतें म्हणून. कॉलेजांत ज्या बहुतेक मुली येत होत्या, त्या कुणी वकीलांच्या, कुणी डॉक्टरांच्या, कुणी सरकारी नोकरांच्या, अशा होत्या. व्यापाऱ्यांच्या कुणींच नव्हत्या. मी व्यापाऱ्याची मुलगी आहें, असं जमनाबेन म्हणत असे पण तें सुलोचनेला पटत नसे. 'खाणावळीचा धंदा म्हणजे कांहीं व्यापार नव्हे' असं सुलोचनेचं म्हणणं नि जमनाबेन मला व्यापाऱ्याची मुलगी म्हणण्याचा आग्रह धरी. तिचं म्हणणं असं होतं, खाणावळ हा अन्नाचा धंदा—तिचा बाप करीत होता तो वस्त्राचा धंदा. त्या अन्नवस्त्राच्या संबंधानं आमची ही मैत्री जमली होती.

मी जमनाबेनच्या घरीं जात असें त्यावेळीं तिची आई मला मोठ्या

आदरानं वागवी. ती म्हणे " तुम्ही महाराष्ट्रीय लोक मोठे बुद्धिवान, पण नोकरी करायची तुम्हांला हौस फार. फार तर वकिली, डाक्टरी कराल पण व्यापारांत कधीं पडणार नाहीं. व्यापारांत पडलांच—तर कापडाच्या किंवा स्टेशनरीच्या. दोन्ही धंदे एकंदरींत सुरळीत चालण्या-जोगे. कॉटन मार्केटमधें जाऊन जगाच्या व्यवहाराच्या उलाढाली कर-ण्याची कुवत असूनही तुम्हीं मागं राहतां—कच खातां—नि म्हणूनच दरिद्री राहातां. आमच्या घरीं एव्हढी संपत्ती आहे ती कांहीं नुसती कापडाच्या धंद्यावर नव्हे. एकाद्या संध्याकाळीं येऊन पाहा, कसं सारखं टेलिफोन चाललेलं असतं."

कॉटन मार्केटच्या उलाढालींची हकीकत ती सांगूं लागली, म्हणजे देहभान विसरून जाई.

सुलोचनेला त्या बोलण्याचा कंटाळा येत असे. तिला राजकारणाचं मोठंच वेड होतं. वर्तमानपत्रांतल्या गप्पा मारणं तिला बरं वाटे. केसरी अमुक म्हणतो, क्रॉनिकलचं असं मत पडतं, नि व्हॉइस ऑफ इंडिया असं म्हणतो; या तिच्या रोजच्या गप्पा असायच्या. सुलोचनेच्या या वर्तमानपत्री गप्पांचा जरी मला तिट्कारा नसला तरी कंटाळा येई. केसरी असं म्हणतो नि लोकमान्य तसं म्हणतात 'पण तूं काय म्हणतेस?' म्हणून तिला विचारलं तर कांहीं सांगतां येत नसे. ती म्हणे, " या राजकारणाच्या गोष्टी हीं वर्तमानपत्रं आहेत म्हणून आपल्याला कळतात. या बाबतींत मत द्यायचा अधिकार आपला नाहीं."

मला तें पटत नसे. ज्या विषयांत आपल्याला मत द्यायचा अधि-कार नाहीं किंवा जो विषय आपल्याला समजत नाहीं—किंवा ज्या विषयाचा आपल्याला उपयोग नाहीं—त्याची चर्चा करणं मला आवडत नसे. मी तिला विचारीं, " ही राजकारणाची चर्चा केल्याचा आपल्याला फायदा काय?" तिला त्यावर उत्तर कांहींच देतां येत नसे. मला वाटे

नुसती फॅशन म्हणून ती राजकारण बोलत असे, या पलीकडे तिला त्यांत गम्य नव्हतं, किंवा कळकळही नव्हती.

जमनाबेनच्या घरीं मी वारंवार जात असें. तिच्या बापाची नि माझी गांठ क्वचितच पडे. सहवासानं मला गुजराती चांगलं बोलतां येऊं लागलं होतं म्हणून मी गुजराती वाचायलाही सुरवात केली.

घरीं गुजराती वर्तमानपत्र घेऊन मी वाचूं लागलें—विशेषतः व्यापारी बातम्या वाचूं लागलें-म्हणजे कित्येक जण माझी थट्टा करीत असत. चोरून कोणती गोष्ट करणं मला आवडत नसे. वर्तमानपत्र वाचायचं म्हणजे चांगली मी ऑफिसांतल्या खुर्चीवर बसून वाचीत असें.

त्यांत एक दुसराही उद्देश होता. बाळासाहेबांना होणारा मोह अनावर होऊं नये म्हणून शक्य तेव्हढं करून ऑफिसांत बसायचं मी ठरवलं होतं.

कांहीं दिवसांनीं ही थट्टा हळूहळू मावळत चालली. मी फारशी बोलत नसें किंवा फारसं कुणाला उत्तरही देत नसें, त्यामुळं लोकांत माझं एक प्रकारचं वजन बसलं होतं. कुणी थट्टा करून म्हणत असत, कीं मी पोक्तपणाचा आव आणतें म्हणून—पण कुणी माझी तरफदारीही करीत असत.

दिनूभाऊ म्हणत, " पहिल्यापासूनच या पोरीला मोठेपणाचा आव आणण्याची संवय आहे "—माझ्याकडे वळून ते म्हणत, " आतां गुजराती वर्तमानपत्र वाचूं लागलीस का ! नि तेंही व्यापारी पान ! काय समजतं आहे तुला ? का उद्यां शेअर बाजारांत जाणार आहेस, कीं हुंड्या पटवणार आहेस-कीं सटोडिया बनणार आहेस ? "

त्यांची टकळी सारखी सुरू असे. मी कांहीं उत्तर देत नसें. तितक्यांत आई आली तर ते म्हणत, " मोठी होतां होतां तुमची ही पोर बरीच शिष्ट बनूं लागली आहे. मला हें तुमचं वळण आवडतं. सर्वांशीं अगदीं सारखेपणानं वागायचं तुमचं वळण जर ही चालवील तर मला तेव्हढंच बरं वाटेल—पण ही शिष्टपणाचा आव आणण्याची संवय एव्हांपासून लागणं कांहीं बरं नाहीं. "

अशीं भाषणं ऐकून मला मोठं कौतुक वाटे. आपल्यांत कांहीं तरी फरक होतो आहे—नि तो लोकांच्या नजरेंत भरण्याइतका आहे, याची साक्ष पटल्यामुळं मला एक प्रकारचा आनंद होई.

माझ्यांत हा फरक कां होतो आहे याची कल्पना जरी आईला नव्हती तरी बाळासाहेब मात्र त्या बाबतींत पूर्ण जागे होते. त्यांनीं एक प्रकारें माझी भीति घेतली होती. एकाद्या वरिष्ठाशीं नोकरानं वागावं तसं ते माझ्याशीं वागत होते. खरं म्हटलं तर, आई मालकीण होती. पण आईशीं वागतांना ते घरांतल्या एकाद्या वडील माणसाशीं—म्हणजे आई, मावशी, चुलती अशा कुणा वडील बाईशीं—जसं वागावं तसे वागत. पाहाणाराला वाटे, कीं हे कुणी आमच्या नात्याचेच असावेत. पण माझ्या समोर ते जास्त अदब दाखवीत असत.

दररोज येऊन एकदां तरी माझ्या खोलींत हजेरी द्यायची, हिशेबा-ठिशेबाची चर्चा करायची नि मग निघून जायचं, असा त्यांनीं क्रम ठेवला होता.

कांहीं दिवसांपूर्वीं त्यांच्या डोळ्यांत दिसणारी विशिष्ट चमक त्यांच्या डोळ्यांत मधून मधून दिसे—नाहीं असं नाहीं—पण ती अगदींच क्षणमात्र. आली आली, गेली गेली, असं व्हायचं. तरी तें माझ्या ध्यानांत आल्यावांचून राहात नसे.

एक दिवस सुलोचना मला भेटायला माझ्या घरीं आली होती. बाळासाहेबांना काय लहर आली कोण जाणे; पण त्यावेळीं त्यांनीं येऊन माझ्या खोलींत ठाणं मांडलं.

सुलोचना राजकारणाच्या गोष्टी बोलूं लागली नि त्यांत त्यांनीं तोंड घातलं. गांधींचं राजकारण श्रेष्ठ, कीं लोकमान्याचं राजकारण श्रेष्ठ, असा तो विषय होता. दोघांचीही मोठ्या जोरजोरानं चर्चा चालली होती नि मी शांतपणानं ती ऐकत होतें.

मी कांहींच बोलत नाहीं असं पाहून बाळासाहेब म्हणाले, " तुम्ही

कां स्वस्थ वेणूबाई ?"—( त्या दिवशीं त्यांनीं मला एकदां जें 'वेणूबाई' म्हटलं तो हट्ट त्यांनीं सारखा चालू ठेवला होता. पण त्यानंतर त्यांना 'बाळाभाऊ' म्हणण्याचा धीर मात्र मला झाला नाहीं. )

मी हंसून म्हटलं, "ज्या विषयांत आपल्याला कांहीं कळत नाहीं त्या विषयांत उगीच तोंड घालणं मला आवडत नाहीं. मी वर्तमानपत्रं वाचतें–पण त्यांतलं राजकारण कधीं वाचीत नाहीं."

"तिच्या डोक्यांत एकच वेड शिरलं आहे," सुलोचना म्हणाली, "तिला व्यापारी व्हायचं आहे, पेढ्या काढायच्या आहेत, सट्टे खेळायचे आहेत, बाजार काबीज करायचा आहे नि व्यापाराच्या जोरावर हिंदुस्तानला स्वराज्य मिळवून द्यायचं आहे."

सुलोचना मोठ्यानं हंसली नि बाळासाहेबही हंसले.

मला कांहीं तें आवडलं नाहीं. दोघांनीं जसा कांहीं कट केला होता. एकाच दिवसांत दोघांची जशी कांहीं गट्टी जमल्यासारखी झाली होती.

ती निघून गेल्यावर बाळासाहेब मला तिच्या घरचा पत्ता विचारूं लागले. मी विचारलं, "तिला कां नाहीं विचारलात पत्ता ? तुम्हाला काय करायचं आहे तिच्या घरच्या पत्त्याशीं ? जाणार आहांत वाटतं तिला भेटायला ? तिच्या घरीं तिची आई आहे, बाप आहे, भावंडं आहेत. इथल्याइतक्या मोकळेपणानं तिथं राजकारणाची चर्चा करतां यायची नाहीं. येतेच आहे कीं ती इथं—मग करा हवी तेव्हढी राजकारणाची चर्चा !"

बाळासाहेब वरमल्यासारखे झाले. मी जरी रागावून बोलत नव्हतें तरी माझ्या बोलण्यांत खोंच होती, थोडी अधिकारवाणी होती. बुद्धिपुरस्सर मी तसं बोलत होतें. बाळासाहेबांच्या मनावर माझ्या बोलण्याचा परिणाम व्हावा अशी माझी इच्छा होती. तसा परिणाम झाला कीं नाहीं हें मात्र मला कळलं नाहीं.

बाळासाहेबांनीं विचारलं, " तिचं लग्न ठरलं आहे वाटतं ? "

" कुणाचं ? " मी म्हटलं, " सुलोचनेचं का ? मी असल्या चांभार-चौकशा करीत नसतें. ठरलं लग्न तर केव्हां तरी होईल नि तुम्हा–आम्हाला आमंत्रणंही येतील. "

मी गप्प राहिलें. बाळासाहेबही गप्प राहिले; पण तिथून उठून गेले नाहींत. मी वर्तमानपत्र वाचीत होतें.

किती तरी वेळ झाला तरीही बाळासाहेब निघून जात नाहींत असं पाहून मी म्हटलं, " कांहीं काम आहे का ? "

गंभीरपणें बाळासाहेब म्हणाले, "हो !"

दोघंही बराच वेळ स्तब्ध राहिलों. बाळासाहेबांनीं बोलायला सुरवात केली. सुरवाती पूर्वी ते जरासे खाकरले—जसे कांहीं ते आतां व्याख्यानच देणार होते.

बाळासाहेब म्हणाले, " माझ्या बोलण्याबद्दल वैषम्य वाटून घेऊं नका. कुटुंबांतल्या एकाद्या माणसाइतकीच तुम्हीं माझ्याबद्दल काळजी घेतां, याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. मला इथं परकेपणा वाटत नाहीं हें जरी खरं असलं, तरी स्वातंत्र्याचा अभाव मात्र जाणवल्याशिवाय राहात नाहीं. स्वतंत्र बिऱ्हाड करून राहावं असं आतां मला वाटूं लागलं आहे. "

" मग तुम्हाला नोकरीही दुसरी पाहावी लागेल. " मी ठासून सांगितलं.

" ही अट आहे का ? " बाळासाहेब म्हणाले, " सत्यभामाबाई असंच म्हणतात का ? "

" आई काय वाटेल तें म्हणेल, पण ही 'माझी' अट आहे. ती माझी अट पाळायला मी आईला भाग पाडीन. इथं नोकरी करायची तर तुम्हाला इथंच राहिलं पाहिजे. तुमच्यावर माझा विश्वास नाहीं. बाहेर

गेलांत तर तुम्हीं बिघडल्याशिवाय राहाणार नाहीं अशी माझी खात्री आहे—नि तुम्हीं बिघडूं नये अशी माझी इच्छा आहे. ”

“ कां ? ”

“ तुमच्या कल्याणासाठीं. ”

पुन्हां दोघंही बराच वेळ स्तब्ध राहिलों. “ मी सत्यभामाबाईंना विचारूं का ? ” बाळासाहेबांनीं अधीरपणानं विचारलं.

“ विचारा हवं तर ! ” मी म्हटलं, “ पण आईकडून तुम्हाला हेंच उत्तर मिळेल अशी मी खबरदारी घेईन. आई माझ्या शब्दाबाहेर जाणार नाहीं. ”

बाळासाहेबांची मुद्रा बदलली. त्यांचा चेहेरा भेसूर झाला. तारवटलेल्या डोळ्यांनीं माझ्याकडे पाहात ते म्हणाले, “ काय झालं माझं अकल्याण झालं म्हणून ? यापूर्वी कुठं झालं होतं माझं कल्याण ! तसं पाहिलं तर माझ्या आयुष्याचा सत्यनाश झाला आहे. काय आशा आहे आतां मला ? मला हें सुख दुखूं लागलं आहे. असं वाटतं, पुन्हा गटारांत लोळावं. कशासाठीं मी चांगुलपणानं राहावं ? कुणासाठीं ? कुणाच्या समाधानासाठीं ? ”

मी म्हटलं, “ माझ्या–आमच्या ! तुमच्या अन्नावर आम्हीं वाढलों आहोंत, उघड्या डोळ्यांनीं तुमचं अकल्याण झालेलं पाहणं आम्हाला कसं बरं वाटेल ? ”

“ हें झालं तुमचं बोलणं,” बाळासाहेब तितक्याच निष्ठुरतेनं बोलले, “ पण माझ्या मनाकडे कोण पाहातो आहे ? नुसतं जेवण-खाण, घटकाभर हिंडणं, येऊन पुन्हां कामाला लागणं, म्हणजे कांहीं आयुष्याचं सारसर्वस्व नव्हे. मनुष्य जे कांहीं उपद्व्याप करतो, नोकरी-चाकरी करतो, ती जितकी स्वतःसाठीं असते तितकीच दुसऱ्या एकाद्या जीवासाठीं असते. असा एक जिवाभावाचा जीव, आपल्याशीं समरस होईल असा कुणी दुसरा जीव, सोबती म्हणून–सुखदुःखाचा वाटेकरी म्हणून—

मिळाला पाहिजे असं कुठल्या तरुणाला वाटत नाहीं ? तारुण्याच्या ऐन मर्यादेवर मी आलों आहें. जसजसा काल जातो तसतसं वार्धक्य जवळ येऊं लागलं आहे !—" ते थांबले. त्यांनीं एक सुस्कारा टाकला.

त्यांच्या बोलण्याचं मला भय वाटूं लागलं. " जाऊंदे, " बाळासाहेब म्हणाले, " माझं बोलणं तुला कळणार नाहीं. तूं अजून पोर आहेस. माझ्यासारखी संकटांतून गेली नाहींस. माफ कर, मी तुला तूं म्हणतों म्हणून; पण दुसरा शब्दच माझ्या तोंडीं येत नाहीं. अहो-जाहो म्हणणं आतां मला दुःसह होऊं लागलं आहे—"

त्यांनी टवकारून माझ्याकडे कांहीं वेळ पाहिलं. अंतःकरणांतून जरी मी घाबरलें होतें तरी शक्य तितका गंभीरपणाचा आव आणण्याचा प्रयत्न करीत होतें. पण मला भीति वाटली—मागल्या प्रसंगाची आठवण झाली—मी अगदीं सावध राहिलें होतें.

पण काय वाटलं कुणास ठाऊक, बाळासाहेब एका झटक्यासरशीं खोलींतून निघून गेले.

मला हायसं वाटलं.

## प्रकरण १३

## सुशिक्षणाचे अनुभव येऊं लागले

त्या दिवसापासून बाळासाहेब माझ्याशीं ज्या पद्धतीनं वागूं लागले ती पद्धतच मोठी विलक्षण होती. एकादं कुलुंग कुत्रं जसं धन्याच्या मागून हिंडतं, तसेच बाळासाहेब माझ्या बाजूनं फिरत असत. ' नको ' म्हणणं माझ्या जिववर येई. अगदीं इमानी नोकरसुद्धां धनिणीची सेवा बजावायला तयार नसेल इतक्या तत्परतेनं ते माझ्या सेवेला हजर असत.

एकदां मी कॉलेजांत जायला निघालें असतां त्यांनीं वाहणादेखील पुढं आणून ठेवल्या तेव्हां तर मला धक्काच बसला.

खाणावळींतल्या लोकांच्या तें नजरेला आलं. कित्येक हंसले, कित्येक खाकरले नि कित्येकांनीं डोळे फाडले; पण बाळासाहेबांच्या मुद्रेंत एवढा सुद्धां फरक झाला नाहीं. निर्विकार चेहऱ्यानं मी कॉलेजांत निघून गेलें.

कित्येक दिवस असा क्रम सुरू होता नि तो बंद करणं मला अशक्य होऊन बसलं होतं—त्याबरोबरच लोकांची चाललेली थट्टा बंद करणं तितकंच अशक्य झालं होतं.

काय होईल तें होवो, कुणाच्या थट्टेकडे किंवा टायल्यांकडे लक्ष द्यायचं नाहीं, असा मी मनाशीं निर्धार केला.

मला निनावी पत्रं येऊं लागलीं. त्यांत अचकट विचकट मजकूर लिहिलेला असे. नुसता बाळासाहेबांचा संबंध जोडला असता तर मला फारसं अप्रस्तुत वाटलं नसतं; पण खाणावळींत जेवायला येणाऱ्या,

परिचित नसलेल्या, अशा कित्येक फॅशनेबल विद्यार्थ्यांशीं संबंध जोडून ज्यावेळीं मला पत्रं येऊं लागलीं त्यावेळीं मी भांबावून गेलें. काय करावं हें सुचेनासं झालं.

मी तीं पत्रं कुणाला दाखवलीं नाहींत—सुलोचनेकडेसुद्धा त्या बाबतींत कांहीं बोललें नाहीं. आईकडे गोष्ट काढण्याची तर सोयच नव्हती.

हा प्रकार सहन करणं आतां माझ्या शक्तीबाहेरचं झालं होतं. खाणा-वळीच्या भिंतीवर असंच कांहींतरीं अचकट विचकट लिहून जाहिरनामे लावलेले ज्यावेळीं दिवाणजींनीं पाहिले, त्यावेळीं मी ही गोष्ट आईच्या कानीं जाऊं न देण्याबद्दल दिवाणजींना बजावलं.

बाळासाहेबांचा आणि त्यांचा जरी समेट झाला नव्हता तरीही, आपलं काम चोख बजावायचं या बाण्यानं, ते बाळासाहेबांच्या वर्तनाकडे दुर्लक्ष करीत होते. त्यापुढं बाळासाहेबांनीं पैशाची अफरातफर केली नाहीं.

दिवाणजींच्या नजरेला जेव्हां हे जाहिरनामे आले तेव्हां त्यांनीं पाळत ठेवण्यास सुरवात केली. एकेकदा तर त्यांनीं रात्रीच्या रात्री जागून काढल्या.

एका रात्रीं गुन्हेगार सांपडला. आश्चर्याची गोष्ट ही होती, कीं ज्या कांहीं विद्यार्थ्यांचीं नावं घेऊन माझ्यावर आरोप करण्यांत आले होते त्याच विद्यार्थ्यांच्या टोळक्यांतला हा एक विद्यार्थी होता—म्हणजे त्याचं नांव घेऊन देखील त्यानंच आरोप केले होते; हें जेव्हां मला दिसून आलं तेव्हा मी आश्चर्यचकित झालें. पाहाटे चार वाजतां येऊन त्यानं हा जाहिरनामा चिकटवला होता. दिवाणजींनीं त्याला मुद्देमालासह पकडलं, नि मला जागं केलं. दिवाणजींनीं, संभावना करण्याचे जेव्हढे कांहीं शिष्ट-अशिष्ट प्रकार आहेत, त्या सगळया प्रकारांनीं त्याची संभावना केली.

त्याला माझ्यापुढं आणून दिवाणजी म्हणाले, " एव्हढ्यानं भागायचं नाहीं, वेणूताई. तुमची चप्पल कुठं आहे ? तुमच्या चप्पलनं मी याला चांगला बडवणार आहें. "

दिवाणजींचं तें म्हणणं मला आवडलं नाहीं. मी त्यांच्या हातून चप्पल काढून घेतांना म्हटलं, " आपल्यासारख्या वडील माणसांनीं माझ्या चप्पलला हात लावणं बरं नाहीं. "

निगरगट्टपणें तो विद्यार्थी म्हणाला, " बाळासाहेबांनी चपला आणून पुढ्यांत ठेवल्या तर चालतात वाटतं ? "

मला तिरमिरी आली नि त्यासरशीं मी दिवाणजींच्या हातून काढून घेतलेलं चप्पल त्याच्या डोक्यावर मारलं.

" आहाहा ! " तो विद्यार्थी उद्गारला, " आज मी धन्य झालों. माझ्या वल्लभेची चप्पल आज माझ्या डोक्यावर बसली ! "

" मॅड तर नाहीं ना हा ! " मी उद्गारलें.

"कसला मॅड !" दिवाणजी म्हणाले, " अहो हें काव्य आहे. तुम्हीं ओळखत नाहीं या विद्यार्थ्यांना. मी यांना चांगले ओळखतों. लेकाचे बायके आहेत बेटे बायके. सकाळींच उठून वेणीफणी करून हँगिंग गार्डनवर पोरींच्या मागें जातात, त्यांच्या चपला खातात नि खूष होऊन कॉलेजांत, का शाळेंत, का कुठं तरी जातात. "

मी त्या विद्यार्थ्याला विचारलं " तुम्हीं कॉलेजांत जातां का ? "

" हो. जात होतों, " तो म्हणाला, "पण आतां अभ्याम करायला सुचत नाहीं. मी वेडा झालों आहें—"

" असं पहा दिवाणजी, " मी म्हटलं, " हा वेडा झाला आहे. याला ठाण्याला पाठवण्याची व्यवस्था करा. तिथं राहिला कांहीं दिवस म्हणजे येईल ताळ्यावर. "

तो कुठलीशी एक कविता गाऊं लागला असं पाहून त्याला दिवाणजींनीं बाहेर लोटून घालवलं.

जेवायच्या वेळीं निर्लज्जासारखा तो आला. दिवाणजी त्याला घाल-वून देत होते पण मी इनूकार केला. मी म्हटलं, " असल्या माकडचेष्टांची मला पर्वा वाटत नाहीं. काय चालायचं आहे तें खुशाल चालूं द्या. "

मी बेफिकिरी दाखवली खरी, पण ती गोष्ट माझ्या मनाला लागल्यावाचून राहिली नाहीं. त्या दिवशीं संध्याकाळीं मी जमनाबेनच्या आईला भेटायला गेलें नि झालेली सारी हकीगत तिला सांगितली. ती म्हणाली, " हा प्रकार कांहीं नवा नाहीं. माझ्या जमनालादेखील अशीं पत्रं येत असतात. ती मला आणून दाखवते. वेडे आहेत म्हणून समजावं नि स्वस्थ राहावं ! "

त्यावेळीं सुलोचनेलाही तोंड फुटलं. ती म्हणाली, " अगदीं ठराविक अक्षरांत लिहिलेलीं अशीं कांहीं पत्रं मला येतात. त्यांत अचकट विचकटपणा नसतो. मी तीं सगळीं पत्रं जपून ठेवलीं आहेत. आईला किंवा बाबांना कुणाला दाखवलीं नाहींत. तुझ्याकडे देखील बोललें नव्हतें अजून."

" मला दाखव पाहूं तीं पत्रं, " मी म्हटलं.

जमनाबेनच्या आईशीं मी बोलत बसलें होतें तोंपर्यंत तिनं घरीं जाऊन पत्रं आणलीं. मी तीं पाहिलीं. त्या पत्रात गोष्टी प्रेमाच्या होत्या खऱ्या पण ' प्रेम ' हा शब्द त्यांत कुठंच आला नव्हता. लेखकाला सुलोचनेच्या मनावर प्रामाणिकपणें परिणाम करायचा होता, असं वाटत होतं. त्यांतलं एक पत्र मला महत्त्वाचं वाटलं. त्याच्या शेवटीं लिहिलं होतं, " प्रेमानं मी वेडा झालों आहें, असें म्हणणाऱ्या तरुणांप्रमाणें मी भलतीच भाषा वापरीत नाहीं. तुझ्याशीं सुखाचा संसार थाटावा अशी माझी इच्छा आहे. तुझे वडील श्रीमंत आहेत, मी एक दरिद्री माणूस आहें. अन्नालासुद्धां मोताद आहें. परक्यांच्या उपकृतीखालीं माझा चरितार्थ आणि अभ्यास चालला आहे. पुढलें भवितव्य मला उज्वल दिसतें आहे. तुझा हात जर मला मिळाला तर आयुष्य उज्वल करण्यास मी समर्थ होईन. तूं मला पाहिलें आहेस पण मी कोण

आहे हें आज प्रकट करण्याची माझी इच्छा नाहीं. तुझ्याकडून पत्राच्या उत्तराची मी अपेक्षा करीत नाहीं. नुसत्या दृष्टिक्षेपानं सुद्धां तुला ओळख दाखवण्याचा मी प्रयत्न करणार नाहीं—मग त्या दृष्टिक्षेपाला तुझ्याकडून उत्तर मिळावें असें कशाला मला वाटेल ? मी हीं पत्रें कां लिहितों असें तूं मला विचारशील ? पण—माझा नाइलाज आहे. मन अनावर होऊं नये, वासना जागी होऊं नये, भलभलत्या कल्पना मनांत येऊं नयेत, एवढ्यासाठीं मी हीं पत्रें लिहितों. तीं तुला पाठवावींत अशीसुद्धां माझी इच्छा नसते. पण मी तुला तीं कां पाठवतों, हे माझें मलासुद्धां कळत नाहीं—वाचल्यावर हीं पत्रें तूं विसरून जा, असें मी म्हणणार नाहीं. योगायोग असला तर आपली भेट होईल आणि भेट झाली तर माझी खात्री आहे. कीं तूं मला पारखी राहणार नाहींत. ”

पत्रं लिहिणारा माणूस अगदींच बेफाम नसावा असं मला वाटलं. असं त्रिलक्षण वर्तन हा कां करतो, याचा विचार करण्यासाठीं मी पुन्हां पुन्हां त्या पत्राचं निरीक्षण करूं लागलें तेव्हां मला दिसून आलं, कीं अक्षर माझ्या ओळखीचं आहे.

कुठं पाहिलं होतं हें अक्षर मी ? मी डोक्याला बराच ताण देऊन पाहिला. मला थोडा संशय आला म्हणून मी या गोष्टीचा छडा लावण्याचा निश्चय केला.

त्यादिवशीं रात्रीं खाणावळींत साफसुफीचं काम चालू असतां मी बाळासाहेबांना बोलावून घेतलं. मी माझ्या उजव्या हाताच्या दोन बोटांना चिंधी बांधून घेतली होती. बाळासाहेब आले यावेळीं मी त्यांना म्हटलं, “ माझी बोटं कापलीं आहेत, मला लिहितां येत नाहीं. एव्हढे हे संस्कृत श्लोक जरा उतरून द्या पाहूं. बाळासाहेबांनीं लगलीच लिहिण्यास सुरवात केली नि नक्कल पुरी होतांच ते कागद माझ्याजवळ दिले.

“ एव्हढंच काम ? ” बाळासाहेबांनीं विचारलं.

मी ' हो ' म्हणतांच ते निघून गेले.

साऱ्या गोष्टींचं निराकरण झालं. ते अक्षर बाळासाहेबांचं होतं. दोन्हीं अक्षरं मी ताडून पाहिलीं.

बाळासाहेबांनीं पूर्वी एकदां सुलोचनेबद्दल केलेले प्रश्न मला आठवले.

मला प्रश्न पडला, प्रामाणिकपणें हीं पत्र लिहिलीं आहेत का ? खरो-खरच बाळासाहेबांना सुलोचनेबद्दल कांहीं ओढ आहे का ? मग ' मी विद्यार्थी आहे ' असं भासवण्याचा प्रयत्न या पत्रांत कां केला जात होता ?

मला आणखी आश्चर्य वाटलं. मला वाटलं होतं तितके बाळासाहेब भोळे नव्हते. पत्रं लिहिण्यांत त्यांनीं चांगलंच लेखनकौशल्य दाखवलं होतं. विशिष्ट उद्देशानं लिहिलेलीं तीं बनावट पत्रं, खरीं वाटण्याइतकीं बेमालूम होतीं. अगदीं कसलेल्या लेखकाला शोभेल इतकं लेखनकौशल्य या पत्रांत दाखवलं जात होतं.

ती गोष्ट मी तेवढयावरच सोडून दिली. सुलोचनेकडे बोललें नाहीं कीं बाळासाहेबांनाही त्याची दाद लागूं दिली नाहीं.

असेच कांहीं दिवस गेले. पुन्हा सुलोचनेला पत्र आलं, त्यावेळीं तिनं तें मला दाखवलं. ' यंदा परीक्षा पास झालों म्हणजे मी येऊन तुला ओळख देईन ' वगैरे मजकूर त्या पत्रांत होता.

मला पुन्हा संशय आला. अक्षरासारखं अक्षर तर नसेल. खरोखरच एकाद्या विद्यार्थ्यानं हें पत्र पाठवलं नसेल का ? उगीचच बाळासाहेबांचा संशय कां घ्या !

दुसऱ्या दिवशीं दुपारीं मी बाळासाहेबांना बोलावणं पाठवलं. ते येतांच सरळ पत्र त्यांच्या हातीं दिलं नि म्हटलं, " हें अक्षर तुम्हीं ओळखतां का ? "

बाळासाहेब कांहीं वेळ त्या पत्राकडे, कांहीं वेळ माझ्या चेहेऱ्याकडे, आळीपाळीनं पाहात होते. मी पुन्हां तोच प्रश्न केला त्या वेळीं ते म्हणाले, " हो ! "

" कुणाचं अक्षर हें ? "

" हें माझं अक्षर आहे. हें पत्र मी लिहिलं आहे. "

" कुणाला ? "

" सुलोचनेला. "

" सुलोचनेला कां ? "

" हें एक माझं वेड आहे. कुणीं तरी माझ्यावर प्रेम करावं असं मला वाटतं. कुणी तरी अंतःकरणाच्या भावनेनं माझी आठवण करावी असं वाटतं. माझ्या पाहाण्यांत तुम्ही दोघीच आलां आहांत. तुम्हां दोघींचीच मला साधारण माहिती आहे. एकदां वाटलं होतं, कीं असं पत्र लिहून तुला पाठवावं, पण पुन्हां मी विचार केला. माझ्या उद्देशाचा चरितार्थ झाला नसता. तूं ओळखलं असतंस. सुलोचनेला मी पत्रं पाठवलीं आहेत, तीं ती तुला दाखवील असं मला वाटलं नव्हतं. मी फार खबरदारी घेत होतों. माझ्यावर विश्वास ठेव किंवा ठेवूं नकोस, मी कधींच तिला ओळख दिली नसती किंवा कबुलीही दिली नसती-तशीच मी तिच्याकडून कोणत्याच प्रकारची अपेक्षा ही करीत नाहीं. मी काय म्हणतों तें कदाचित् तुला कळणार नाहीं. कुणी तरी अंतःकरणाच्या जाणिवेनं—जिवाच्या जिव्हाळ्यानं—तळमळीनं—कळकळीनं–काळीज तोडून माझ्याकडे पाहावं—माझी आठवण करावी—कुणी म्हणजे भलत्याच कुणी नव्हे–माफ कर–कुणा तरुणीनं—अविवाहित तरुणीनं माझी अशी आठवण करावी, एव्हढयाच करतां मी हीं पत्रं लिहितों. मला काय वाटतं तें स्पष्ट सांगतां येत नाहीं. कल्पना होत असली तर तुझी तूंच पहा. पण अगदीं निर्मळ अंतःकरणानं—निरपेक्ष बुद्धीनं मी हीं पत्रं लिहिलीं आहेत. कृपा करून या पत्रांवरून गैरसमज होऊं देऊं नकोस किंवा त्या बिचारीला माझं नांवही कळवूं नकोस—"

" कां ? नांव कां कळवूं नको ? " मी विचारलं.

" मी अशींच तिला पत्रं घालीत राहाणार आहें. त्यांत माझ्या

मनाला समाधान आहे. मी चरित्रहीन होऊं नये असं तुला वाटत असेल, तर कृपा करून माझी ओळख त्या बिचारीला देऊं नकोस. ''

तो विलक्षण प्रकार ऐकून मी थक्क झालें. मानसशास्त्रांतलं हें एक गूढ प्रमेय आहे असं मला वाटलं.

मी वचन दिलं तेव्हां बाळासाहेब निघून गेले. तें वचन पाळायचं नि पुढं काय होतं तें पाहायचं, असा मनाशीं ठाम निश्चय करून मी मूग गिळून स्वस्थ बसलें.

# प्रकरण १४

## सुलोचनेचं लग्न झालं

आणखी कांहीं दिवस निघून गेले. सार्‍या गोष्टी पूर्वींप्रमाणेंच चालल्या होत्या. तीच थट्टा, तींच पत्रं, तेच जाहिरनामे—नि बाळासाहेबांची ती तशीच सेवा करण्याची पद्धति—सारं कांहीं पूर्वींप्रमाणेंच चाललं होतं.

बाळासाहेबांच्या भाषणाचा माझ्या मनावर परिणाम झाला होता. त्यामुळं माझी वृत्ती मात्र पूर्वींची राहिली नव्हती. हा मनुष्य दांभिक आहे, लबाड आहे, कीं बदमाश आहे, याची मला कांहींच कल्पना ठरवतां येईना. पत्रं लिहिल्याचं त्यांनीं प्रामाणिकपणें कबूल केलं याचंच मला आश्चर्य वाटलं. त्यांनीं नाकबूल केलं असतं तर त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल मला शंका आली असती. माझ्या मनानं एकच घेतलं, कीं माझ्यापुढं खोटं बोलायची बाळासाहेबांची टाप नाहीं.

" हल्लीं बरेच दिवसांत पत्र येत नाहीं. " सुलोचना म्हणाली. तिला चुटपुट लागल्यासारखी झाली होती. त्या पत्रांची तिला एक प्रकारची संवय लागली होती. तसलीं तीं पत्रं यानींत नि त्यांच्यावर मनोराज्यं बांधावींत अशी आपल्याला संवय लागल्याचं तिनं मनमोकळेपणानं माझ्यापुढं कबूल केलं होतं नि त्यामुळंच तीं पत्रं बंद झाल्यानं ती अस्वस्थ झाली.

बाळासाहेबांना मी सरळ सरळ विचारलं, " मी पत्र पाठवीत राहाणार ' असं मला बजावून देखील आतां पत्रं बंद कां केलींत ? "

ते म्हणाले, " मी विचार करतों आहें. कांहीं निश्चय ठरवतां येत नाहीं मला. "

" किती विसंगत बोलतां आहांत बाळासाहेब ! मनांत येणारे विशिष्ट प्रकारचे विचार नाहींसे होण्यासाठीं जो उपाय म्हणून तुम्हीं करीत होतां तो उपाय जर असा बंद ठेवलांत, तर तुमचं मन नाहीं का बिघडणार ! पर्यायानं तुमचं चारित्र्य नाहीं का बिघडणार ? "

" तोच अंदाज मी पाहातों आहें. " बाळासाहेब दोन्हीं हातांनीं डोकं धरून जमिनीकडे पाहात म्हणाले, " पण माझ्या मनाचा अंदाज लागत नाहीं. पत्रं पाठवणं बंद केल्यामुळें माझं मन अस्वस्थ झालं आहे. पत्रं पाठवावीं असं वाटतं पण आतां तें तुला कळलं असल्यामुळें पत्र लिहिण्यातलं स्वारस्य गेलं. तें माझं गुपित होतं. तें जोंपर्यंत गुप्त होतं, तोंपर्यंत त्यांत मजा होती—नि ती मजा होती म्हणूनच मनां-तल्या क्लृप्त कल्पना विसरल्या जात होत्या. आतां तसं होणार नाहीं. कां माझं हें नुकसान केलंस ? कां असा घात केलास ? मी काय असं तुझं वाईट केलं होतं, कीं माझ्या आयुष्यांतलं एवढंच सुख नाहींसं केलंस ?—"

बोलत असतांना ते माझ्याकडे पाहात नव्हते. अगदीं जमिनीकडे पाहून बोलत होते. त्यांच्या मनांत चाललेली खळबळ त्यांच्या प्रत्येक शब्दासरशीं फुटून बाहेर पडत होती.

मला त्यांची फारच दया आली. मी म्हटलं, " असं पहा बाळा-साहेब, असा उद्वेग करून घेऊं नका. उद्वेग केल्यानं मनाला समाधान मिळत नाहीं. त्याला कांहीं तरी उपाय केला पाहिजे. तुम्हांला वाटतात तशीं नुसतीं पत्रं लिहित जा. पाठवूं नका पाहिजे तर–किंवा असं करा–कुणाला तरी पत्र पाठवलंच पाहिजे असं असलं, तर मला पाठवा ना तीं पत्रं !—" बाळासाहेबांनीं एकदम माझ्याकडे वर पाहिलं. त्यांच्या डोळ्यांत एक विलक्षण चमक आली होती.

अगदीं गंभीर होऊन बाळासाहेब म्हणाले, " मग पत्र तरी कशाला पाठवायला हवं ? इथंच बोललं तर काय बिघडतं ? "

" तो तुमचा पूर्वीचा उपाय बरा आहे." मी शक्य तितका गंभीर पणाचा आव आणून म्हटलं, " हा नुसता उपाय आहे, ध्यानात ठेवा, हें नुसतं औषध आहे. त्याच्यापलीकडे भलत्या कल्पना मनांत आणायच्या नाहींत. अगदीं मनाचं समाधान करून घ्या. तुम्हांला जितक्या मोकळेपणानं जशीं पत्र लिहायचीं असतील तशीं लिहा. मात्र मर्यादा ओलांडतां नये, हें ध्यानांत ठेवा."

" ठीक आहे." असें म्हणून बाळासाहेब नित्याच्या संवयीप्रमाणें तांतडीनं निघून गेले.

माझं मलाच आश्चर्य वाटलं. काय वेडेपणा केला मी हा! याचा भलताच फायदा बाळासाहेबांनीं घेतला तर?—नि भलताच परिणाम माझ्या मनावर झाला तर?—

मी आतां तशी कांहीं लहान नव्हतें. आई म्हणे, 'तुझ्या वयाच्या आगोदर होतों तेव्हां आम्हांला दोन दोन मुलं होऊन गेलीं होतीं!'

आजचा काळ निराळा होता. आजच्या काळात माझ्या बरोबरीच्या कोणत्याच मुलींना मुलं झालीं नव्हतीं किंवा त्यांचीं लग्नं सुद्धां झालीं नव्हतीं. कितीकींच्या मनांत लग्न नि मुलं, अशा प्रकारच्या कल्पनासुद्धा आल्या नव्हत्या.

माझ्या मनांत देखील ती कल्पना यायला नको होती. मी कुटुंबांत वावरत नव्हतें. आमच्या घरांत कुणीं जोडपीं नव्हतीं. लग्नकार्याला मला कुणीं बोलावीत नसत, कारण माझी आई विधवा नि मी खाणावळवालीची मुलगी—कुणीं बोलावलंच तर आई मला जाऊं देत नसे—तिला वाटे माझा तिथं अपमान होईल. अशा प्रकारें कौटुंबिक कल्पना मनांत येण्याजोगी परिस्थिति नसतांही, मी हें संकट माझ्यावर कां ओढवून घेतलं? माझं मलाच आश्चर्य वाटलं.

सुलोचनेच्या मनावर फार विलक्षण परिणाम झाला होता. ती अगदीं वेडावल्यासारखी झाली होती. इतर मुलींना पत्रं येतात हें

तिला माहीत होतं. त्यांतलीं कांहीं पत्रं त्यांना आवडतात—कांहींबद्दल तिटकारा येतो. अशा येणाऱ्या कांहीं पत्रांतून एका मुलीच्या लग्नाचा योगायोग आला होता. आपल्याला पत्रं येतात हें कांहीं तरी विशेष आहे, कुणाचं तरी मन आपल्याकडे ओढलं जातं, असा बायकी अभिमान, अशी व्हॅनिटी, जी तिच्या अंतःकरणांत गाजत होती, तिचा त्या पत्रांनीं चरितार्थ होत होता.

सुलोचनेचं हें वेड दिवसेंदिवस विकोपाला जाऊं लागलं. तिला अभ्यास सुचेनासा झाला. रस्त्यांतून जाणाऱ्या प्रत्येक तरुणाकडे ती उगीचच निरखून पाहूं लागली. आपल्याकडे कुणी पाहातो आहे का मान वळवून ?—हें पाहाण्याच्या बाबतींत ती इतकी बेसावध राहूं लागली, कीं रस्त्यानं जाणारांच्यादेखील तें सहज ध्यानीं येऊं लागलं. ती चूक मी तिच्या नजरेला आणून दिली—पण माझा उपदेश तिच्या गळीं उतरेना.

ती मला म्हणाली, " तुला हें कळायचं नाहीं. अशीं पत्रं आलीं असतीं तुला, नि तीं नंतर बंद झालीं असतीं, म्हणजे मी काय म्हणतें तें तुला कळलं असतं. तूं वाचलीं आहेसच तीं पत्रं. कोण बिचारा असेल तो ? इतकीं वक्तशीर पत्रं पाठवायचा—तो बंद कसा झाला ? आजारी तर नाहीं पडला ? पत्तासुद्धा त्यानं कसा लिहिला नाहीं—पत्ता कळता तर मी चौकशी तरी केली असती. मला काय वाटतं हें तुला सांगायला माझ्याजवळ शब्द नाहींत. कशाला उगीच बोलूं ! ज्याचं जळे त्याला कळे ! —"

असंच कांहींतरी असंबद्ध बोलत ती इतकी वाहावत गेली, कीं तें ऐकून मला भीति वाटूं लागली.

तिला पुन्हां पत्रं पाठवायला बाळासाहेबांना सांगणं मला योग्य वाटलं नाहीं म्हणून मीच एक युक्ती युक्ती काढली नि तिला पत्र लिहिलं तें असंः—

' कोणत्या विशेषणांनीं तुला संबोधूं ? पूर्वी जीं विशेषणं मी तुला लावीत होतों तीं लावायचा अधिकार आतां मला राहिला नाहीं. तसें पत्र लिहिण्याच्या परिस्थितीपलीकडे मी गेलों आहें. मनाची इच्छा असते एक आणि दैवीं असतें भलतेंच. वडील माणसांचें मन मी मोडलें असतें तर माझें पुढलें सारें आयुष्य फुकट गेलें असतें. त्यांच्या अधिकाराला मी बळी पडलों आणि विवाहबद्ध झालों, हें कळवण्या-साठीं तुला मी हें शेवटचें पत्र लिहीत आहें. या जन्मांत आतां आपली गांठ पडणें शक्य नाहीं आणि मी कोण हें कळवण्याची आतां जरुरीही राहिली नाहीं—' .

मी पत्र लिहिलं खरं पण अक्षराचं काय, हा प्रश्न मला पडला. बाळा-साहेबांसारखं अक्षर काढणं मला शक्य नव्हतं नि दुसऱ्या अक्षरांत जर पत्र गेलं असतं तर तिचा विश्वास बसला नसता.

चट्कन् माझ्या डोक्यांत कल्पना आली. म्हटलं बाळासाहेबांची एकदा कसोटी पाहावी.

मी बाळासाहेबांना हाक मारली. ते आले तेव्हां त्यांची मुद्रा घाबरल्या-सारखी झाली होती.

" का बोलावलंस ? " ते म्हणाले, " तुझा बेत फिरला का ? "

" नाहीं, " मी म्हटलं, " पण त्या बेताला पक्कं महत्त्व येण्यासाठीं तुम्हाला एक गोष्ट करावी लागेल. मी हें पत्र लिहिलं आहे. याची इथंच बसून मला नक्कल करून द्या—

त्यांनीं तें पत्र हातीं घेतलं नि वाचून पाहिल्यावर म्हटलं, " हें पत्र चालणार नाहीं—"

" मग कसं पत्र पाहिजे ? " मी विचारलं.

" तें मीच लिहितों. " बाळासाहेब म्हणाले.

एक क्षणभर मला विचार पडला.

'माझ्यावर विश्वास ठेव' असं म्हणून बाळासाहेब निघून गेले. माझं मलाच आश्चर्य वाटलं. एकेक काय प्रसंग ओढवून घेतें आहें मी? बाळासाहेबांनीं असं पत्र लिहिलं नि पुन्हां तें बनावट आहे म्हणून कळवलं तर मग या पत्राचा उपयोग काय? कदाचित सुलोचनेची भेट घेतली नि झालेली हकीकत तिला सांगितली—तर माझी एकुलती एक मैत्रीणसुद्धां मी गमावून बसलें असतें.

ही परीक्षेची वेळ होती. त्यांत माझीही परीक्षा होती नि बाळासाहेबांचीही होती. आशेचा एक अंधुकसा किरण मला समोर दिसत होता.

बाळासाहेबांना मी मोठं आमिष दाखवलं होतं. त्या आमिषाला भुलून जर ते—

बाळासाहेब पत्र लिहून घेऊन आले— दोन्हीं पत्रं मी ताडून पाहिलीं, त्यावेळीं मला पटलं, कीं बाळासाहेबांचं म्हणणंच खरं होतं. माझ्या समोरच पोष्टाचं पाकिट पत्ता लिहून त्यांनीं माझ्याजवळ दिलं नि कांहीं न बोलतां ते निघून गेले.

दुसऱ्या दिवशीं सुलोचना कॉलेजांत आली नाहीं. कॉलेज सुटल्यानतर मी तिच्या घरीं गेलें तेव्हां ती तापानं फणफणत असल्याचं मला दिसून आलं. मी जवळ जाऊन बसलें तेव्हां ती एक शब्दसुद्धां बोलली नाहीं. कितीतरी वेळ माझ्याकडे नुसती पाहात राहिली.

एकदम तिला रडूं कोसळलं. तिनं इकडे तिकडे पाहिलं, उशाखालीं हात घातला नि रडत रडत तें पत्र माझ्या हातीं दिलं.

पत्र वाचून मी तिच्याकडे परत दिलं तेव्हां तें घेऊन तिनं त्याच्या चिंध्या करून भिरकावून दिल्या.

"तूं म्हणतेस तेंच खरं वेणू," ती म्हणाली, "पुरुषांवर विश्वास ठेवूं नये. काय भाषा पाघळली आहे! लाज नाहीं वाटत मेल्याला माझं लग्न झालं म्हणून सांगायला? मग कशाला मला पत्र लिहीत होता?—"

" आतां पटलं ना !" मी म्हटलं, "आतां हें वेड डोक्यांतून काढून टाक नि त्याच्याबरोबर हा ताप देखील फेकून दे पाहूं."

" या पत्रानं मला ताप आला, असं कां तुला वाटलं ?" सुलोचना म्हणाली, " नाहीं बरं, मला ताप आला त्याचं कारण निराळं आहे–"

ती कांहीं बोलत नाहीं असं पाहून मी विचारलं " काय कारण ? "

त्रासल्यासारखं करून ती म्हणाली, " कारण तुझं कपाळ ! तुला एव्हढंच कळायचं ! तूं जा पाहूं इथून. तूं समोर असलीस तर माझा ताप आणखी वाढेल."

" बरं तर–आतां उद्यां येईन." असं म्हणून मी तिथून उठलें.

सुलोचनेच्या आईला एका बाजूला घेऊन मी झालेली सर्व हकीकत सांगितली. सदाशिवरावांना ती न कळूं देण्याचं मी तिच्याकडून वचन घेतलं.

" मला वाटलंच तें ! " सुलोचनेची आई म्हणाली, " दुसरं कांहीं नाहीं, पोरीला कुणाच्या तरी गळ्यांत बांधली पाहिजे. पुरे झालें हें कॉलेज नि शिक्षण !"

सुलोचना बरेच दिवस आजारी होती. ती बरी झाली पण तिनं कॉलेज सोडलं. तिची माझी गाठ क्वचितच पडूं लागली. मीच मुद्दाम जाऊन भेटे त्या वेळीं तिची भेट होई; पण तिचा स्वभाव अगदींच बदलून गेल्यामुळं मला तिच्याबद्दल वाटत असलेली आपुलकी नाहींशी झाली.

बाळासाहेबाना ती हकीकत मी मुळींच कळवली नाहीं–नि त्यांना ती कळलीही नसावी. एक दिवस मला अचानक कळलं, कीं सुलोचनेचं लग्न झालं.

मला आश्चर्य वाटलं—मला नुसतं कळवूं सुद्धां नये या लोकांनीं !

## प्रकरण १५
## मी खेळ खेळूं लागलें

सुलोचनेचं लग्न झाल्याची बातमी कळतांच मी तिच्या घरीं गेलें. सुलोचना सासरीं निघून गेली होती. मला पाहातांच तिची आई ओशाळली. ती म्हणाली, " तुला आमंत्रण द्यायला पाहिजे होतं. पण कसं चुकून राहिलं कोण जाणे. सुलोचनादेखील विचारीत होती. पण झालें तें झालं ! बरं घर मिळालं सुलोचनेला. नवरा म्युनिसिपालटींत नोकर आहे. चांगला पन्नास रुपये पगार मिळवतो आहे—"

" झालं तें बरं झालं, " मी म्हटलं, " तुम्ही गडबडींत विसरलां असाल—पण सुलोचनेनं मला नुसतं येऊन कळवूंसुद्धा नये, याचं मला वाईट वाटलं. बरं स्थळ मिळालं. बरं झालं. आली माहेरीं तर मला कळवा. जमल्यास भेटून जाईन. लग्नाचं आमंत्रण द्यायला नाहीं आली ती आतां लग्न झाल्यावर कसली येऊन भेटते म्हणा ! "

" असं वाईट वाटून घेऊं नकोस बाई ! " सुलोचनेची आई म्हणाली, " चूक झाली खरी. आतां ती कबूल केल्यावांचून गत्यंतर नाहीं. "

मी निरोप घेऊन निघालें. ही कसली चूक ! खाणावळबाईच्या मुलीला बोलवायचं नाहीं, एव्हढाच त्यांतला इत्यर्थ होता.

सुलोचनेचं लग्न झालं, तें मी तिच्या पत्रापत्रीची हकीकत सांगितल्यामुळं. असं असतांना माझी आठवण झाली नाहीं, हें किती शपथा घेऊन सांगितलं असतं तरी मला खरं वाटलं नसतं.

सुलोचनेचं लग्न झाल्याचं मी बाळासाहेबांना कळवलं; तेव्हा ते कांहींच बोलले नाहीं. त्यांना वाईट वाटलं कीं काय, हें त्यावेळीं त्यांच्या चेहेऱ्यावरून दिसून आलं नाहीं. त्यावरून मी असा अंदाज केला, कीं बाळासाहेबांनीं तिला जीं पत्रं लिहिलीं होतीं तीं नुसतीं त्यांच्या समाधानासाठीं होतीं असं जें त्यांनीं सांगितलं, त्यांत कांहीं सत्यांश होता.

असेच आणखी कांहीं दिवस गेले. या मधल्या मुदतींत विशेष कांहीं घडलं नाहीं.

एक दिवस मी आश्चर्यचकित झालें. बाळासाहेबांचं पत्र पोष्टानं आलं.—मी जवळ जवळ विसरून गेलें होतें—किंवा तो विषय मनांतून काढून टाकला होता म्हणा ना—पण बाळासाहेबांचं पत्र आलं त्यावेळीं पूर्वीच्या गोष्टी माझ्या नजरेसमोर उभ्या राहिल्या. पत्र ज्यावेळीं मी वाचायला घेतलं त्यावेळीं तर मी अगदीं थक्कच झालें. सुलोचनेला जात होतीं त्या पत्रांत नि या पत्रांत जनिअस्मानाचं अंतर होतं.

या पत्रांत बाळासाहेबांनीं कोणत्याच प्रकारचा बनावटपणा केला नव्हता. पत्राची भाषा साधी होती तशीच सिधी होती. त्यांत त्यांनीं आपल्या पूर्वीच्या हकीकतीच बऱ्याचशा लिहिल्या होत्या. लहानपणच्या वर्तनाबद्दलचीसुद्धां जवळ जवळ क्षमा मागितली होती. प्रस्तुतच्या परिस्थिति बद्दल उपकार व्यक्त केले होते नि शेवटीं लिहिलं होतं, ' जन्मभर मी चुकत आलों आहें. इतरांच्या मानानं माझं आयुष्य कांहीं मोठं नाहीं. पण या एवढयाशा आयुष्यांत मी किती तरी चुका केल्या आहेत. चुका केल्या हें मला कळतं—पण त्यांच्याबद्दल मला पश्चात्ताप होत नाहीं. पुढल्या आयुष्यांत मी तसल्या चुका करणार नाहीं; पण पूर्वीची परिस्थितीच अशी होती, कीं त्या चुकांबद्दल मी जर पश्चात्ताप प्रदर्शित केला तर तो माझा प्रामाणिकपणा होणार नाहीं. पत्र लिहायला मी ज्यावेळीं सुरवात केली त्यावेळीं कांहींतरी काव्य करावं असं मला वाटलं'

होतं; पण लिहितां लिहितां वृत्ती बदलली. कांहीं लिहायचं तें प्रामाणिकपणानं लिहायचं असं ठरवून मी लिहू लागलों. तोंडी किंवा लेखी उत्तराची मी आशा करीत नाहीं."

शेवटीं कोणत्याच प्रकारचा मायना न लिहितां नुसतीच सही केली होती.

त्या पत्रात त्यांनीं जें जें काहीं आणखी लिहिलं होतं, तें इथं लिहून ठेवणं मला बरं वाटत नाहीं. त्यांत जशा चुका होत्या तसेच गुन्हेही होते. अविचार होते तसेच अनाचारही होते.—व्यभिचारसुद्धां होते.

तरीही तें पत्र मला आवडलं. त्या पत्राचा माझ्या मनावर परिणाम झाला. पश्चात्ताप होत नाहीं, असं जरी बाळासाहेबानीं म्हटलं होतं तरी अशाप्रकारें झालेल्या गुन्ह्याचा कबुलीजबाब देणं म्हणजे एकप्रकारचा पश्चात्ताप प्रदर्शित करणंच होय, असं मी धरून चाललें.

त्या रात्रीं मला झोप लागेना. त्या पत्रांतला मजकूर सारखा माझ्या डोक्यांत घोळत होता. गुन्ह्याची कबुली द्यायलादेखील कांहीं थोडं-थोडकं धैर्य लागत नाहीं !

मला वाटलं, हा माणूस धीराचा आहे—लेचापेचा नाहीं. याला स्वाभिमान आहे पण माझ्या लहानपणीं नाझर म्हणत असत तसं, याला याच्या वडील माणसांनीं वळण लावलं नाहीं. हें एक कीड लागलेलं गोड फळ आहे, तेव्हढी कीड काढून टाकली कीं—

माझं मलाच आश्चर्य वाटलं—ही नुसती सहानुभूती का ?—कीं दया ?—कीं याहीपेक्षां पुढल्या पायरीचा प्रादुर्भाव माझ्या मनांत होत होता ? बोलून चालून हा भ्रष्ट पुरुष. याच्याबद्दल मनांत सहानुभूती उत्पन्न होणें, म्हणजे सुद्धां माझ्या मनाचा दुबळेपणा नव्हे का ?

चारचौघांत जर त्यानं ही हकीकत कबूल केली असती, तर लोकांनीं त्याचे वाभाडे काढले असते—त्याला तुच्छ लेखलं असतं—जवळ उभं

सुद्धां केलं नसतं. मला तसंच वाटलं पाहिजे होतं. मग मला सहानुभूति कां वाटली ?

विचारांच्या भ्रमणानं मी कातावून गेलें. जीव अगदीं कावल्या-सारखा झाला. माझं मन दुबळं झालं आहे असं मला वाटूं लागलं. माझ्या खंबीरपणाबद्दल मला अभिमान वाटत होता, माझ्या खंबीर-पणाच्यां जोरावर मी बाळासाहेबासारख्या भ्रमिष्ट माणसाला बंगवलं होतं—तीच मी, त्याच्या एका पत्रामुळें, अशी वितळून जाऊं लागलें तर माझ्या अभिमानाचा बडिवार काय ?

झोंपेंतमुद्धां मला त्या पत्रांतल्या कहीकतींचीं स्वप्नें पडत होतीं.

दुसऱ्या दिवशीं कॉलेजांतून येतांना मी जमनाबरोबर तिच्या घरीं गेलें. झालेली सारी हकीकत मी तिच्या आईला सांगितली. माझी कैफियत ऐकून ती विचारांत पडली. ती कांहींच बोलत नाहीं असं पाहून मी मनांतल्या मनांत कोमेजून गेलें.

मी तिला विचारलं, " माझी चूक झाली का ? कुठं चुकलें मी ? नि चुकलें असलें तर ती चूक दुरुस्त कशी करायची ? "

" काय उत्तर द्यावं हेंच मला कळत नाहीं. " ती म्हणाली, "तुझ्या धैर्याचं मात्र मला कौतुक वाटतं. केवढं धाडस केलंस तूं हें ! एकाद्या मवाली माणसाला प्रेमपत्र लिही म्हणून सांगणं ! मला दुसऱ्या कुणीं सांगितलं असतं तर खरं देखील वाटलं नसतं मला आश्चर्य वाटतं तें हेंच, कीं प्रेमपत्रिका न लिहितां त्यानं आपल्या दोषांचा पाढा तुझ्यापुढं वाचला. मला वाटतं त्याची सदसदविवेक बुद्धि जागी झाली आहे. अशा वेळीं त्याला दुखवूं नकोस. एकाद्या चुकीबद्दल किंवा गुन्ह्याबद्दल एकाद्या माणसाला जर आपण डिवचलं तर तो इरेला पडतो नि दुप्पट चुका करूं लागतो. तुझं चाललं आहे तें.बरं आहे स्वतःच्या अंतःकरणांत सावधगिरी ठेव आणि जें जें कांहीं घडेल तें मला सांगत जा.

कुसन्याला सांगितलं म्हणजे आपण कसं वागायचं हें आपोआप आपल्याला कळूं लागतं, असा माझा अनुभव आहे."

जमनाबेनच्या आईच्या उपदेशानं माझ्या मनाचं थोडं समाधान झालं. मी चुकलें असलें तरी घसरलें नाहीं, एव्हढं मला कळलं. परिस्थिती आटोक्यांत आहे नि ती योग्य प्रकारें आटोक्यांत ठेवली तर एक नादुरुस्त झालेला आत्मा पुन्हां सावरला जाईल, अशी माझ्या अंतःकरणांत आशा उत्पन्न झाली.

ती नवी कल्पना मोठी उत्तेजक होती. मला प्रश्न पडला—एका जीवाच्या उद्धाराच्या मार्गाला मी मार्गदर्शक होतें आहे! कल्पना मोठी भव्य होती. जीवांचा उद्धार करण्याचा अधिकार महात्म्यांचा. मी एक क्षुद्रात्मा होतें. जगाच्या इतिहासांत मी मातीमोल सुद्धां नव्हतें—ती मी एका परित्यक्त जीवाला मार्गावर आणण्याची कल्पना मनांत खेळवूं लागलें, याचं मला जितकं आश्चर्य वाटलं तितकाच उल्हासही वाटला.

त्या कल्पनेनं माझं मन उचंबळून आलं. एक नवीन योजना अंतःकरणांत जागी झाली. त्या भावनेच्या भरांत मी बाळासाहेबांच्या चरित्राकडे पाहूं लागलें नि मला त्यांच्याबद्दल करुणा वाटूं लागली.

माझ्यापेक्षां वयानं मोठा असलेला तो पुरुष मला अगदीं लहान बालक आहे असं वाटूं लागलं—

—एक रांगणारं बालक चालायचा प्रयत्न करीत असतां घसरलं, पडलं, ठेचाळलं, पुन्हां उठून उभं राहण्याचा प्रयत्न करूं लागलं; त्याला उठून उभं राहतां येईना म्हणून त्याला हात दिला—हात धरून घटकाभर चालवलं—असंच कांहीं दिवस हात धरून घटकाभर चालवलं नि—भविष्यकालाकडे नजर टाकतांच मला दिसलं, कीं तें चालत सुद्धां न येणारं बालक, नुसतं चालूंच नव्हे, तर चांगलं धावूं लागलं.

खाणावळीचे व्यवहार सुरळीतपणें चालत होते. दिवाणजीदेखील हल्लीं बाळासाहेबांबद्दल बोलले तर चार चांगलेच शब्द बोलत असत.

जेवायला येणारीं माणसं देखील त्यांच्याबद्दलची पूर्वीची आढी हळूहळू विसरून जाऊं लागलीं होतीं.

आई तर सारखी बाळासाहेबांची स्तुतीच करीत असे. तिला मधून मधून भीति वाटे. ती म्हणे, "हल्लीं पाहातें आहें, बाळा-साहेब फारच निवळले. माझ्यापेक्षां देखील कसोशीनं सारे व्यवहार पाहातात. कुणाला वाटेल, कीं जसे कांहीं ते खाणावळीचे मालकच आहेत. पण मला थोडी भीति वाटते. हें सारं टिकलं पाहिजे. मूळचा स्वभाव जर उचंबळून आला तर पुन्हां मूळपदावर यायचं. ते असेच राहिले तर हा सारा व्यवहार बाळासाहेबांच्या हातीं देऊन मी सुखानं झोपा काढीन, इतका मला त्यांच्याबद्दल विश्वास वाटूं लागला आहे."

बरेच दिवस झाले पण बाळासाहेबांनीं दुसरं पत्र लिहिलं नाहीं.

एक दिवस ते अचानक माझ्या खोलींत आले. मी अभ्यास करीत होतें. ते आलेले पाहातांच मी पुस्तक बाजूला ठेवलं तेव्हां ते म्हणाले, "माझ्यामुळं तुझ्या अभ्यासाचा खोळंबा झाला नाहीं ना ?"

"नाहीं." मी म्हटलं, "तसा कांहीं विशेष नाहीं. राहिला अभ्यास तर असं अडण्याजोगं कांहीं नाहीं. आमचं कॉलेजांतलं हें असं आहे. कायदा आहे म्हणून कॉलेजांत जायचं. बाकी शिकवतात काय तिथं ? सारीं मुलं टिवल्याबावल्या करण्यांत वेळ घालवीत असतात. पगार मिळतो म्हणून प्रोफेसर खुर्चीवर बसून कांहींतरी कोकलत असतात झालं. कोण ऐकून घेतं आहे त्यांचं ? नोट्स मिळवतोंच आहोंत आम्ही. परीक्षेच्या पेपरांचीं उत्तरं द्यायला नोट्सचा आम्हाला जितका उपयोग होतो तितका प्रोफेसरांच्या शिकवण्याचा कांहीं होत नाहीं !—"

"मला या साऱ्याच गोष्टी अपूर्व आहेत. मॅट्रिक झालों त्यावेळीं वाटत होतं, कीं मी कॉलेजांत जाईन म्हणून. बाबांप्रमाणेंच इंजिनियर व्हावं अशी माझी महत्वाकांक्षा होती. पण—कशाला हव्यात त्या गोष्टी ?

मी आलों होतों—" बाळासाहेब मधेंच थांबले नि बसल्या जागीं चुळबुळ करूं लागले.

बाळासाहेबांच्या वृत्तींत हल्लीं गंभीरपणा आला होता. मधेंच ते मला म्हणाले, " मला कांहीं फार सांगायचं नाहीं. माझं पत्र तूं वाचलंस ना ? " मी होकारार्थी मान हालवली तेव्हां ते म्हणाले, " पुन्हां लिहूं का आणखी कांहीं ? "

मी हंसलें—चांगली पोट धरून हंसलें. त्यामुळं बाळासाहेब आणखीच गंभीर झाले. मी म्हटलं, " पत्रं पाठवूं नका असं का मी तुम्हाला सांगितलं होतं कधीं ? मग तो प्रश्न कां केलात ? "

" ठीक आहे." म्हणून बाळासाहेब निघून गेले.

मी कां हंसलें याचा माझा मलाच उलगडा होईना. पण त्या हंसण्याचा बाळासाहेबांच्या मनावर आघात होण्याइतका परिणाम झाला, असं मला वाटलं. पत्र लिहिण्याच्या बाबतीत त्यांनीं गैरफायदा घेऊं नये, मी नुसता खेळ खेळतें आहे असं त्यांना वाटावं, म्हणून का मी हंसलें ?

## प्रकरण १९
## माझं लग्न कसं व्हावं ?

बरेच दिवसांनी नांझर आले. हल्लीं ते बरेच वृद्ध दिसूं लागले होते. मी इंटर पास होऊन बी.ए. च्या क्लासांत गेलें, हें ज्यावेळीं त्यांनीं ऐकलं त्यावेळीं ते आश्चर्यानं अगदीं थक्क होऊन गेले. त्यांना तें खरंच वाटेना.

आई म्हणाली, " मलासुद्धां खरं वाटत नाहीं. कुठली कोण मी— तिकडे गांवीं असतें तर माझ्या दाहीदिशा झाल्या असत्या. माझ्या त्या स्थितींत, माझी मुलगी आतां दोन वर्षांनी बी. ए. होईल असं जर गांवीं असतां मला सांगितलं असतं, तर खरं सुद्धां वाटलं नसतं. "

" तें खरं आहे," नांझर म्हणाले, " पण ही आतां बी. ए. होऊन करणार आहे काय ? लग्नच करणार ना ? हिला कांहीं मामलेदार होतां येणार नाहीं—मुनसफ होतां येणार नाहीं. मला वाटतं, वकिली करतां येते हल्लीं, असं म्हणतात; पण उद्यां ही वकील म्हणून पाटी लावून बसली तर कोणता शहाणा माणूस आपला खटला घेऊन हिच्याकडे जाणार आहे ? मला वाटतं, सत्यभामाबाई, झालं एव्हढं शिक्षण पुरे झालं. आतां या पोरीचं लग्न करून टाका. केव्हढी मोठी दिसते ही ! चांगली चार मुलांची आई दिसते—नि ही अविवाहित ? आतां तुम्हाला म्हणावं तरी काय ? गांवीं असतां तर तुम्हाला वाळींत टाकलं असतं. असलं कांहीं पाहिलं, कीं शहारे येतात आम्हां लोकांच्या अंगावर ! अगदीं

पहिल्यापासून ओरडतों आहें, कीं तुम्हांला मुलीला वळण लावतां येत नाहीं ! काय केलंत हें ?—"

" आतां वळण तें काय लावायचं ? " आई थंडपणानं म्हणाली, तुम्हीं पाहातांच—उद्यां ही बी. ए. होणार म्हणून खाणावळीचीं कामं करायचीं कांहीं चुकवित नाहीं—सारे हिशेब ती तपासते—देणं घेणं तीच पाहाते—दर रविवारीं नि सणासुदिनाच्या दिवशीं वाढायचं काम तीच करते—तिला चांगलं जेवण करतां येतं—पक्वानं करतां येतात—जमाखर्च येतो नि शिवाय आतां बी.ए. होईल. यापेक्षां आतां करायचं तें काय राहिलं ? "

" आतां करायचं तें एकच," नाझर पिसाळून म्हणाले, " आतां करायचं हिचं लग्न ! दुसरं कांहीं नाहीं ! ती परीक्षा गेली उडत ! आतां एकादा चांगला मुलगा पाहा नि हिला पिवळी करा. "

त्यांचं तें भाषण ऐकून मी मोठमोठ्यानें हंसलें; तेव्हां ते म्हणाले, "पाहिलंत कशी चेकाळली आहे ती ! पूर्वी मी आलों तेव्हां माझ्यासमोर उभी राहायलासुद्धां भीत असे—ती आतां माझ्यासमोर माझी टायली करते आहे ! अगदीं उघड उघड मला हंसते आहे ! आतां तूंच सांग पोरी, काय करणार आहेस तूं परीक्षा देऊन ? "

" मी काय सांगूं ? तें परीक्षा दिल्यानंतर मी ठरवणार आहें," मी उत्तर दिलं, " तोंपर्यंत कांहीं ठरवायचं नाहीं असंच मी ठरवलं आहे. "

मांडीवर थाप मारून नाझर म्हणाले, " आधीं मला हें सांग, कीं तूं लग्न करणार आहेस, कीं नुसती बिब्बी होऊन राहाणार आहेस ? "

" तेंही कांहीं ठरवलं नाहीं." मी गंभीरपणानं सांगितलं.

" तें ठरवणारी तूं कोण ? "

" तुम्हींच विचारलंत ना मला ? म्हणून मी तसं सांगितलं. "

" पण समज, उद्यां तुझ्या आईनं तुझं लग्न ठरवलं—चांगला तुझ्या योग्य नवरा पाहून लग्न ठरवलं तर तूं काय करणार आहेस ? "

"त्याचाही मी विचार केला नाहीं. बी. ए. होईपर्यंत माझ्या लग्नाचं कांहीं बोलायचं नाहीं असं आईच म्हणते, तेव्हां ती कशाला या वेळीं घाई करील ?"

विषय तेव्हढाच राहिला; पण नाझर कांहींना कांहीं कारण काढून आईला पुन्हां पुन्हां तेंच तेंच विचारीत होते. मला त्यांची मोठी गंमत वाटत होती. असं हें लग्न म्हणजे आहे तरी काय ? कां या लग्नाच्या एव्हढ्या उठाठेवी ? काय झालं लग्नाशिवाय राहिलं तर ? बाळासाहेबांच्या लग्नाच्या उठाठेवी कुणीं कां नाहीं करीत ?

नाझरांच्या बोलण्याचा आईच्या मनावर परिणाम झाला. तिनं मला एका बाजूला घेऊन विचारलं. "तुला काय वाटतं वेणे ?"

मी म्हटलं, "कशाबद्दल ?"

"हे आतां नाझरसाहेब म्हणत होते त्याबद्दल ?"

"म्हणजे माझ्या लग्नाबद्दल का ?" मी विचारलं, "लग्नाबद्दल सध्या कांहीं विचार करायचा नाहीं, असं तूंच म्हणतेस ना ? मग आतांच असं कां विचारतेस ?"

"आतां नाझर म्हणूं लागले तेव्हां मलाही वाटूं लागलं.—गावीं कळलं तर लोक खरोखरच कल्लोळ करतील; केलाही असेल कल्लोळ त्यांनीं ! नाझर आपले स्पष्टवक्ते, म्हणून त्यांनीं सरळ बोलून दाखवलं. मी कुणाकडे जातयेत नाहीं, कुठं मिळतमिसळत नाहीं—तेव्हां लोक काय बोलतात याची मला कल्पनाही होत नाहीं—"

"तू चांगली भाग्यवान आहेस आई. लोकांत मिसळली असतीस तर तुला त्यांनीं सतावून सोडलं असतं. काय करायचं आहे लोकांशीं ! माझ्या लग्नाचा नि लोकांचा संबंध काय ? आपण अनाथ अपंग होतों, दारिद्र्यांत होतों, त्या वेळीं कुणी लोक आले का मदतीला ? दुसऱ्या कुणी मदत केली का ? आपण हा पसारा मांडला—त्यावेळींही छळच केला ना लोकांनीं ? दैवानं हात दिला म्हणून हे दिवस दिसत आहेत—मग

यांत लोकांचा काय संबंध ? त्यावेळीं जशी आपण लोकांची पर्वा केली नाहीं तशी यावेळींही करायची नाहीं."

आईचं समाधान झालं.

पण माझं समाधान झालं का ?

लग्नाची कल्पना माझ्या डोक्यांत नव्हती. नाझरांच्या कळकळीच्या बोलण्यानं ती कल्पना माझ्या बुद्धीवर परिणाम करूं लागली. कुणाच्या कुटुंबांत मी मिसळत नव्हतें. आमचं सारंच घरदार स्वतंत्र असल्यामुळं शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या कुटुंबांत चाललेले प्रकार मला दिसून येण्याचा संभव नव्हता. सुलोचनेचं लग्न झालं तरीही माझ्या लग्नाबद्दल मला कांहींच वाटत नव्हतं. नाझरांच्या भाषणानं त्या कल्पनेच्या चक्राला गति मिळाली नि तें चक्र सारखं फिरूं लागलं.

जसजशी या विशिष्ट परिस्थितीचा मी विचार करूं लागलें तसतसं माझं मन भांबावून जाऊं लागलं. पहिल्यापासून माझी वृत्ती स्वतंत्र होती. लग्नानंतर हें माझं स्वातंत्र्य कायम राहील का ? विवाहित दांपत्यांचे इतिहास मला माहीत नव्हते. अविवाहित, विधुर, प्रासंगिक ब्रह्मचर्य पत्करलेले कौटुंबिक गृहस्थ, यांच्या समुदायानंच आमची खाणावळ भरली होती. त्यांच्या तोंडून कौटुंबिकतेच्या ज्या गोष्टी ऐकूं येत. त्यावरून कौटुंबिक आयुष्यापेक्षां खाणावळींतलंच आयुष्य त्यांना जास्त इष्ट वाटत असे अशी माझी कल्पना होई. कौटुंबिकतेनं बरेचसे पुरुष असंतुष्ट होतात हें मी पहात होतें—पण कौटुंबिक स्थितीचा मनावर काय परिणाम होतो याचा इतिहास मला माहीत नव्हता.

तो इतिहास माहीत करून घेण्यासाठीं मी पुन्हां जमनाबेनच्या आईकडे धांव घेतली. सुलोचनेच्या आईच्या वृत्तीवरून मला तिच्या कौटुंबिकतेची थोडीशी कल्पना आल्यामुळं जमनाबेनच्या आईला विचारतांनाही मी जरा घाबरलें होतें. नवरा सांगेल तें ऐकायचं, आपलं मत विसरून जायचं, निदान हिशोबांत धरायचं नाहीं, अशी सुलोचनेच्या

आईची वृत्ति होती. जमनाबेनच्या घरचा प्रपंच सुलोचनेच्या घरच्या प्रपंचापेक्षां निराळा होता. तिच्या घरची पुरुष मंडळी, मी जेव्हां जेव्हां जात असें, तेव्हां घरीं गैरहजर असे. साऱ्या दिवसांत पुरुष माणूस तिच्या घरांत दिसायचा नाहीं—नि ज्यावेळीं दिसे त्यावेळीं तो टेलिफोनला कान लावलेला. नवराबायकोचे कधीं चार शब्द होतात कीं नाहीं, याची सुद्धां मला शंका वाटे.

—म्हणून जमनाबेनच्या आईला ज्या वेळीं मी विचारलं त्यावेळीं तिच्या उत्तराची मला भीती वाटत होती.

ती भीति निराधार नव्हती. जमनाबेनची आई म्हणाली, " असं पहा वेणूबेन, हा प्रश्न मोठा बिकट आहे. प्रामाणिकपणें जर मला विचारशील तर मी असं म्हणेनें—धंदा कर, उद्योग कर, तुझ्या आईप्रमाणं स्वतःच्या पायावर उभी राहा; पण या लग्नाच्या भानगडींत पडूं नकोस. पण ज्याअर्थी तूं मला जिवाभावानं म्हणून विचारतेस त्याअर्थी खरं सांगितल्या खेरीज गत्यंतर नाहीं—खरं म्हणजे व्यवहारी खरं—नुसतं खरं नि व्यवहारी खरं यांच्यांत मोठं अंतर आहे—खऱ्याला मर्यादा नाहीं—पण व्यावहारिक खरं हें परिस्थितीवर अवलंबून असतं. आतां हेंच पाहा. मला एव्हढीं चार मुलं आहेत. मोठा गडगंज संसार आहे. चाकर नोकर माणसं आहेत पण तूं पाहातेस का कधीं आम्हीं दोघं घटकाभर एकत्र बसलों आहोंत ! सारे व्यवहार कसे यंत्रासारखे चाललेले आहेत. हें कौटुंबिक जीवन म्हणजे यांत्रिक जीवन—एकदां चांगली गति दिली म्हणजे एंजिन जसं चालूं लागतं, त्याला जसं घटकाभर थांब म्हटलं तर थांबतां यायचं नाहीं, तसं हें आहे. पुरुषमाणसांच्या व्यवहाराचीं चक्रं सुरू झालीं, कीं त्यांच्या दात्यांत गुंतलेलीं बायकांच्या जीवनाचीं चक्रं तशींच फिरूं लागतात. त्याला दुसरी गति नाहीं. त्या गतीच्या बाहेर जायचा जर त्यांनीं प्रयत्न केला तर त्याचे दाते मोडून पडतात. ज्यांच्या ठिकाणीं स्वतंत्र बाणा आहे, अशांनीं या लग्नाच्या भानगडींत पडूं नये. विधवा आहे म्हणून समजावं नि आयुष्य कंठावं—"

ऐकत असतांना मी अगदीं सुन्न झालें होतें.

तिनं आपल्या आयुष्यांतील गोष्टी सांगायला सुरवात केली. त्या इथं लिहिण्याजोग्या नाहींत. ज्या बाईला मी सुखासमाधानांत लोळणारी म्हणून समजत होतें, ती कौटुंबिक आकर्षणाच्यापायीं असंतुष्टतेंत झुरणारी एक प्रेमळ स्त्री आहे, एव्हढीच अटकळ मला करतां आली. तिच्या प्रेमळपणाला व्यवहार आड येत होता. नवऱ्याची व्यवहारी वृत्ती तिच्या प्रेमळपणाचा ओलावा आटवून टाकीत होती. दिवसेंदिवस ती एकप्रकारें कोमेजून जात होती. मुलांचं प्रेम म्हणावं, तर तेंही तितपतच. तीं शाळेंत जात होतीं, अभ्यास करीत होतीं, परीक्षा पास होत होतीं, एका दोघांचीं लग्नं झालीं होतीं, एक मुलगी सासरीं गेली होती, एक मुलगा आईबापांपासून विभक्त होऊन स्वतः व्यापार करून संसार थाटून राहिला होता, ही मात्र एव्हढ्या मोठ्या गडगंज संसारांत ‘ एकुलती एक ’ होऊन राहिली होती.

तिच्या भाषणामुळं मला औदासिन्य प्राप्त झालं. सारा दिवस मी नुसती तळमळत होतें. आज जो माझा दर्जा होता, त्या माझ्या सांपत्तिक नि शैक्षणिक दर्जाच्या अनुरोधानं माझं लग्न अशाच एकाद्या मोठ्या व्यापाऱ्याशीं किंवा अधिकाऱ्याशीं झालं असतं; नि जी स्थिति जमनाबेनच्या आईची झाली तीच माझी झाली असती. मला वाटलं, मी पतीवांचून राहूं शकणार नाहीं. या माझ्या वृत्तीबद्दल ज्यावेळीं मी सूक्ष्म विश्लेषण करून पाहूं लागलें त्यावेळीं मला असं वाटूं लागलं—माझं लग्न झालं तर तें ‘ माझं ’ लग्न झालं पाहिजे !—माझ्या नवऱ्याचं नव्हे—‘मला’ नवरा मिळाला पाहिजे होता—मी कुणाची बायको व्हायला नको होतं !

जसजसा मी विचार करूं लागलें तसतसं माझं मस्तक भणाणून जाऊं लागलं. मन कुठंच स्थिर होईना. माझ्या माहितीच्या टापूंत मी नजर फेंकून पाहिली; पण माझा नवरा व्हायला पात्र असलेला असा मनुष्य माझ्या नजरेला येईना.

मी आईला सांगितलं, "माझं लग्न व्हावं असं तुला वाटत असलं, तर तूं त्या उद्योगाला लाग. तूं कोण कुठला जो नवरा माझ्यासाठीं पाहाणार आहेस तो तरी एकदां मला पाहून घेऊं दे."

माझ्या त्या बोलण्यानं आई बिचारी घाबरल्यासाखी झाली. ती म्हणाली, " अशी एकेरीवर आल्यासारखी काय बोलतेस ! मी कुठं एव्हढी लग्नासाठीं तुला तोशीस लावतें आहें !"

" तूं तोशीस लावली नाहींस-" मी म्हटलं, " तर मी तुला सांगतें, मला लग्न करायचं आहे-मला वाटतं, त्यामुळं माझी परीक्षा कांहीं अडून राहायची नाहीं-लग्न झाल्यावर देखील परीक्षा देतां येईल—पण तूं माझ्यासाठीं कुठला, कसा, कोणत्या दर्जाचा, नवरा पाहाणार आहेस याची मला परीक्षा घ्यायची आहे."

पहिल्यानं ऐकत असतां जरी आई गंभीर होती तरी हें भाषण बोलत असतांनाचा माझा आविर्भाव पाहून हंसली नि म्हणाली, " बरं बरं. आतां त्याच उद्योगाला लागतें. मी जिवंत आहें तोंपर्यंत एकदां तुला उजवून टाकली कीं सुटलें."

माझी मलाच गंमत वाटली मी आपल्याशींच हंसलें नि खोलींत निघून गेलें. पाहातें तों तिथं बाळासाहेबांचं पत्र आलेलं !

## प्रकरण १७

## माझ्या मनावर परिणाम झाला

तें पत्र मोठं विलक्षण होतं. सुरवातीला शेवटाला कसलाच मायना नव्हता. पत्र असं होतं:—

' किती दिवस तरी पत्र पाठवावें म्हणून विचार करीत होतों. बरींच पत्रें मी लिहून पाहिलीं, पण माझें समाधान होईना. सुलोचनेला मी जशीं पत्रें पाठवीत होतों तसें पत्र लिहिण्याचा प्रयत्न केला; पण तें मनाला पटेना. तुला पत्र लिहायचें आणि त्यांत बनावटपणा असायचा ही कल्पनाच मला दुःसह होई. मनाचा निश्चय करून प्रामाणिकपणानें पत्र लिहायचें म्हणून सुरवात केली. तें मात्र अत्यंत कठीण गेलें. दोन ओळींपलिकडेसुद्धां जातां येईना. तें पत्र लिहीत असतांना मला कळलें, कीं माझ्या भावना बदलत आहेत; नव्हे, नवीन भावनांचा उगम झाला आहे. वृत्तीसुद्धां पूर्वीची राहिली नाहीं. अशा वेळीं लिहूं काय ? लिहायचें म्हटलें म्हणजे तें तुला वाचण्याजोगें होईल काय, अशी शंका मनांत आली. दूरच्या अंतरावर असणाऱ्या तुला जर पत्र लिहायचें असतें तर तसें लिहिण्याचा मी हिय्या केला असता. पण इथें तूं मी समोरासमोर. पत्रांत लिहिलें आहे याची आठवण सदोदित जागी असायची. तूं तें वाचलें आहेस हें विसरतां यायचें नाहीं. असें असतांना लिहूं काय आणि कसं ? पत्र लिहिण्याची तूं आज्ञा केलीस म्हणून हें पत्र लिहिलें. हेंच माझें शेवटचें पत्र ! '

खालीं नुसती सही होती. तें पत्र वाचून मला धक्का बसला. असं कांहीं पत्र येईल अशी अपेक्षा मी केली नव्हती. त्या पत्राचा अर्थ मला कळला नि म्हणूनच त्याचा माझ्या मनावर परिणाम झाला.

मला वाटलं, कुठली ही आपत्ती मी माझ्यावर ओढवून घेतली ! मला पश्चात्ताप झाला नाहीं—चूक केली असं वाटलं नाहीं—तरी जें कांहीं केलं तें केलं नसतं तर बरं झालं असतं, असं मात्र वाटायला लागलं.

मी तें पत्र नेऊन जमनाबेनच्या आईला दाखवलं. तें वाचून पाहा-तांच तीही क्षणभर स्वस्थ राहिली.

मी विचारलं, " काय वाटतं तुम्हांला ? "

" मोठा कठीण प्रसंग आहे ! " ती म्हणाली, " तुझं तूंच हें संकट आपल्यावर ओढवून घेतलं आहेस. आतां यांतून कसं मोकळं व्हायचं हें तुझं तुलाच ठरवतां येईल. मी यांत कांहीं सांगूं शकत नाहीं. "

आशेचा एक आधार होता तिथं निराशा झाली. स्वतः विचार करायला मी असमर्थ झालें होतें—आईला यांतलं कांहीं सांगतां येत नव्हतं–नि जमनाबेनच्या आईनं तर सारा भार माझ्यावरच टाकला.

कांहीं विचारच करायचा नाहीं असं मी ठरवलं. जें काय व्हायचं असेल तें होईल. कोणत्याच प्रकारें आपण पुढं पाऊल टाकायचं नाहीं म्हणजे झालं.

बाळासाहेबांच्या वृत्तींत कांहींच फरक झालेला दिसून येत नव्हता. नित्याचे व्यवहार जसे चालायचे तसे चालले होते. पत्राबद्दल उल्लेख त्यांनीं कधींच केला नाहीं कीं मीही नाहीं.

पत्राची भाषा अर्थातच आतां संपली होती. रोजच्या व्यवहारांतल्या भाषेपलिकडे मी कांहींच बोलत नव्हतें. त्यांत माझ्याकडून चूक किंवा फरक होऊं नये म्हणून मी खबरदारी घेत होतें. जितक्या जरबेनं मी रोज बाळासाहेबांना वागवीत असें त्या जरबेंत थोडीशीही ढिलाई होऊं

दिली नाहीं. मी तशीच वागतें, म्हणून बाळासाहेबांनींही आपल्या वर्तनांत फरक होऊं दिला नाहीं.

पूर्वीप्रमाणें पुन्हां एकदां मी त्यांच्या गैरहजेरींत त्यांच्या खोलीची तपासणी केली. तीं क्रीम्स नि फेस पावडर्स–सगळीं कांहीं निघून गेलीं होतीं. मला जरा बरं वाटलं.

मी त्यांच्या टेबलाचे ड्रावर्स उघडून पाहिले. आश्चर्य करण्याजोगी एक वस्तू मला तिथं दिसली. यापूर्वी ती वस्तू तिथं नव्हती.

ती वस्तू म्हणजे बाळासाहेबांच्या आईचा फोटो.

बाळासाहेब येऊन इतके दिवस झाले होते पण हा वेळ पर्यंत त्यांनीं कधीं आपल्या आईच्या नांवाचा उल्लेख केला नव्हता. त्यांनीं तसा उल्लेख केला नाहीं म्हणून मला पूर्वी वाईट वाटे. मागल्या खेपेला मी ज्यावेळीं तपासणी केली त्यावेळीं हा फोटो तिथं नव्हता. मला आश्चर्य वाटलं, आतांच हा कुठून आला ?

मनांत एक विचार आला नि तो अमलांत आणायचं मी ठरवलं. वाटलं, यांतून काय निष्पन्न होतं पाहूं !

मी तो फोटो घेऊन गेलें नि माझ्या खोलींत माझ्या अभ्यासाच्या टेबलासमोर लटकावून ठेवला. तितक्यांत आई माझ्या खोलींत आली नि तो फोटो पाहातांच जवळ जवळ ओरडली. धांवतच ती त्या फोटोजवळ गेली. इकडे तिकडे पाहात असतां तिच्या डोळ्यांतून सारखीं आसवं वाहूं लागलीं.

गंभीर स्वरानं ती मला म्हणाली, "कुठं ग मिळाला तुला हा फोटो ! किती वाटत असे मला—एव्हढं त्यांनीं दिलं पण त्याबरोबरच एक फोटो दिला असता तर ! इतके फोटो घरीं पडले होते. त्यावेळीं त्यांतला एकाददुसरा मी उचलून आणला असता तर कळलंसुद्धां नसतं कुणाला ! पण कसं बाई मला सुचलं नाहीं. बरं झालं, हा फोटो

आणलास. तो चांगला मोठा करून घेतला पाहिजे नि पुढल्या दिवाणखान्यांत टांगला पाहिजे. कुठं मिळाला तुला हा ? ”

मोठी पंचाईत आली. आईला काय सांगावं हें मला कळेना. खरं सांगितल्याखेरीज गत्यंतर नव्हतं.

ती म्हणाली, “ हें बरं केलं नाहींस. विचारलं असतंस तर त्यांनीं नाहीं का म्हटलं असतं ? कदाचित एव्हढाच एक फोटो त्यांच्याजवळ असेल—जिवाभावासाठीं त्यांनीं तो जपून ठेवला असेल—नि तो तूं असा घेऊन आलीस ? त्यांना न विचारतां घेऊन आलीस हें कांहीं बरं नाहीं. आपण त्यांच्याकडून मागून घेऊं—याचा चांगला मोठा फोटो करून घेऊं नि त्यांचा फोटो त्यांना परत देऊं—”

आईचं बोलणं संपतं न संपतं तोंच बाळासाहेब घाबऱ्याघाबऱ्या खोलींत आले. चट्कन मी फोटोआड उभी राहिलें.

आईला खोलींत पाहातांच. ते कांहींच न बोलतां तटस्थपणें उभे राहिले; तेव्हां आई म्हणाली, “ काय झालं बाळासाहेब ? तुम्ही घाबरलेले कां दिसतां ?—” आईला कल्पना आली नव्हती असं नाहीं—पण तीदेखील अंदाज घेत होती.

अगदीं संथपणें बाळासाहेब म्हणाले, “ माझ्या खोलींतली—माझ्या ड्रॉवरांतली एक मोलाची वस्तू हरवली आहे—”

मला दूर लोटून, फोटो काढून हातीं घेत आई म्हणाली, “ हीच का ती ? ”

बाळासाहेबांनी फोटोवर जवळजवळ झडप टाकली नि आईच्या हातांतून तो काढून घेतला.

बाळासाहेब जायला निघाले असं पाहून आई मला दरडावून म्हणाली, “ त्यांची क्षमा माग. ”

जात असतांना वळून बाळासाहेब म्हणाले, “ त्यांत क्षमा कसली मागायची ! सहज आणला असेल तो त्यांनीं. आतां मिळाला, ठीक झालं. ”

बाळासाहेब जायला निघाले असं पाहून आई म्हणाली, " मला हवा आहे तो फोटो. मी तो मोठा करून घेईन नि हा तुमचा तुम्हांला परत करीन. "

न बोलतां बाळासाहेबांनीं तो फोटो आईच्या हातीं दिला नि ते एकदम निघून गेले--फोटो घेऊन आई निघून गेली.

मला अगदीं मेल्याहून मेल्यासारखं झालं. आईच्यासमोर तरी माझी अशी फजिती व्हायला नको होती. बाळासाहेबांच्या खोलींत जाऊन, त्यांच्या नकळत मी त्यांची ड्रावरें धुंडाळतें, हें जें आईला कळलं तें मोठं वाईट झालं. आईनं तसं कांहीं विचारलं नाहीं—तरी पण एकदंरींत तिला अंदाज आल्याशिवाय राहिला नसावा.

मी तशीच बाळासाहेबांच्या खोलींत गेलें. ते ईझीचेअरवर पडले होते मला पाहातांच ते उठून उभे राहिले.

" उठतां कशाला ? बसा ना ! " मी म्हटलं.

मला आश्चर्य वाटलं. बाळासाहेबांच्या डोळयांत आसवं आलीं होतीं. एव्हढं त्यांनीं मन मोकळं केलेलं मी हें पाहिल्यानंच पाहिलं. मी विचारलं, " मागं मी तुमच्या खोलीची झडती घेतली त्यावेळीं हा फोटो इथं नव्हता ?—" बाळासाहेबांनीं नकारार्थी मान हलवली.

" नि मग आतांच हा इथं कुठून आला ? "

" खालीं बस नि ऐक ! " बाळासाहेब म्हणाले, " इतके दिवस झाले मला इथं येऊन—पण आईचं नांव मी उच्चारलेलं तूं कधीं ऐकलं होतंस का ? नाहीं ना ? पण आतां हा तिचा फोटो मी सदोदित नजरेसमोर ठेवतों आहें. साऱ्या आयुष्यांत मी कधीं तिची आठवण केली नाहीं—तुझ्यामुळं मला तिची आठवण झाली—ऐकलंस ! तुझ्यामुळं मला तिची आठवण झाली. अशीच ती मला जरब लावीत असे. ती जरब लावते म्हणूनच मी तिला झिडकारीत असें. तिची आज्ञा मी कधींच पाळली नाहीं. आदर मानाच्या नजरेनं मी तिच्या हयातींत तिच्याकडं

पाहिलं नाहीं. याला कारण आमचे बाबा. माझ्यासमोर ते सदोदित तिला टाकून बोलत असत. तिच्या वेंधळेपणाबद्दल तिला दोष देत असत म्हणून माझा तिच्याबद्दल अनादर झाला. आतां मला कळतं, कीं तो वेंधळेपणा नव्हता. तो चांगुलपणा होता. तिनं चांगुलपणाचं शेत पेरून ठेवलं, तें हें तुमच्या घरीं पिकलं नि म्हणूनच मी आज अन्न खातों आहें. नाहींतर असाच भटकणार होतों. कुणी सांगावं, कदाचित् तुरुंगांत गेलों असतों. अगदीं त्याच बेताला आलों होतों. हेंच कशाला, तूं मला तुरुंगांत पाठवलं असतंस. ही पैशाची मी अफरातफर केली, तेव्हढी पुरेशी होती मला तुरुंगांत पाठ-वायला. सहा रुपये काय, सहाशें काय, सहा हजार काय नि सहा लाख काय; चोरीच्या गुन्ह्याला शिक्षा सारखीच. ऐकलंस, वेणू, ती माझी पहिली चोरी नव्हती. सर्केशींत असतांना चोऱ्या करण्यावरच माझी चैन चालत होती. मी निर्ढावलेला होतों. इथली तुमची व्यवस्था इतकी चोख आहे, कीं त्यामुळं मला बरेच दिवस चोरी करतां आली नाहीं. ज्यावेळीं मी चोरी करूं लागलों त्यावेळीं उघडकीस आलों. आईनं जसं मला वागवलं तसं—माझी कल्पना आहे ती नुसती—तिच्या इतर वर्तनावरून मी अंदाज करतों आहें—तसं तूं मला वागवलंस, म्हणून मी मिंधा झालों—मेल्याहून मेला झालों. त्या दिवशीं मला आईची आठवण आली नि ट्रंकेच्या तळाला चुकून पडून राहिलेला तो फोटो मी शोधून काढला—फ्रेम केला—नि हाताजवळ ठेवला. ज्या ज्या वेळीं भलत्या कल्पना मनांत येतात, मन चळूं लागतं, पूर्वी केलेल्या अनाचारांकडे जाण्याची प्रवृत्ती होऊं लागते, त्या त्या वेळीं तिच्या त्या निर्मळ चेहऱ्याकडे मी नजर टाकतों. त्यामुळं माझं मन शुद्ध होतं. म्हणूनच इतके दिवस मी चोख राहिलों आहें—म्हणूनच तो फोटो गेल्यामुळें मी कासावीस झालों. ऐकलंस? वेणू, त्या फोटोकडे पाहूं लागलों, कीं मला तुझी आठवण येते. त्या चेहऱ्या शेजारीं मला

तुझा चेहेरा दिसूं लागतो. ती आज निघून गेली आहे, तरी देखील तिचं अस्तित्व मला जाणवतं—तुझ्यामुळं जाणवतं—"

बाळासाहेब एकदम ओक्साबोक्सी रडूं लागले. पुढं होऊन त्यांचं सांत्वन करावं, आपल्या पदरानं त्यांच्या डोळ्यांतलीं आसवं पुसावीं, असं एक क्षणभरच मला वाटलं—पण मी आत्मसंयमन केलं.

बाळासाहेब जितक्या चट्कन् माझ्या खोलींतून निघून जात, तशीच मी त्यांच्या खोलींतून निघून गेलें.

## प्रकरण १८

## माझ्या दारावर टिचक्या

मी थट्टेवजा बोललें होतें खरी, पण आईनं तें माझं बोलणं अगदीं हिशेबीं धरलं. ती सारखी उद्योगाला लागली होती. जेवायला येणारीं जीं जीं जुनीं माणसं होतीं, त्यांचीं त्यांचीं घरं शोधून काढून त्यांच्या-मार्फत ती माझ्यासाठीं स्थळं शोधण्याच्या उद्योगाला लागली होती.

या बाबतींत ती माझ्याकडे कांहीं बोलत नव्हती. पण मला मात्र चुटपुट लागून राहिली होती. मी नाहीं असं समजून ती एकदां दिनू-भाऊंबरोबर बोलत असतांना मी ऐकलं तेव्हां मला हें कळलं. तिला सरळ सरळ विचारावं असं माझ्या मनांत आलं होतं; पण तसं करायचा मला धीर होईना.

एक दिवस रात्रीं सारीं कामं आटोपल्यावर, मी अभ्यास करीत बसलें होतें, तिथें आई आली नि म्हणाली, "ऐकलंस वेणे, तुझ्यासाठीं एक स्थळ पाहिलं आहे. पूर्वीच्या परीनं वागायचं म्हणजे तुला सांगायची कांहीं जरूरी नाहीं; पण तूं आतां कांहीं लहान नाहींस—चांगली कर्ती-सवरती झाली आहेस—'माझ्या लग्नाच्या तयारीला लाग' असं मला—आईला—सांगण्याइतकी सुशिक्षित झाली आहेस. म्हणजे त्यांत कांहीं वाईट आहे असं मी म्हणत नाहीं. जसे दिवस येतील तसं वागलं पाहिजे. पण मी एक स्थळ पाहिलं आहे. असं स्थळ शोधून सापडायचं नाहीं, असं दिनूभाऊ म्हणत होते. मुलगा कसलीशी मोठी वकिलीची

परीक्षा पास झालेला आहे. पण वकिली करीत नाहीं. गव्हर्नर साहेबांचं तें कसलं मोठं ऑफिस आहे ना कोटांत—तिथं आहे नोकरीला. चांगला दीडशें रुपये पगार मिळतो म्हणे—"

" थांब आई !" मी म्हटलं, " दीडशें रुपये पगार मिळवणाऱ्या माणसाला का तूं देणार आहेस मला ? दीडशें रुपये पगाराचा नोकर तुला देखील सहज ठेवतां येईल ! तुला काय नि मला काय—एकच. उद्यां या बाळासाहेबांना दीडशें रुपये पगार करायचा म्हटलं तर तूं काय नाहीं म्हणणार आहेस ? असल्या सरकारी नोकराशीं का मी लग्न करूं ? "

आईचा उल्हास मावळून गेला. मला वाटलं, हें तिच्या लक्षांत आलं नव्हतं. दिनूभाऊ बोलले असतील—त्यांनीं अगदीं खुलवून सांगितलं असेल—सरकारी नोकर म्हटला म्हणजे आमच्या लोकांना अगदीं परब्रह्म वाटतं. हा पूर्वीचा परिणाम आईच्या मनावर देखील नव्हता असं नाहीं.

" मग आतां कसं करायचं ?" आई म्हणाली, " उद्यां ते पहायला येणार आहेत तुला."

मी अगदीं सुन्न झालें. इथपर्यंत आली का मजल ? हे पहायला येऊन काय माझी परीक्षा घेणार आहेत ? मी आईला स्पष्ट विचारलं तेव्हां ती म्हणाली, " आतां हें एकदां ठरलं आहे तें होऊन जाऊं दे. कांहीं तरी कारण काढून मोडून टाकूं. पण उद्यां तूं मात्र कांहीं वेडंवाकडं करूं नकोस."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते गृहस्थ आले. तो एक हाडकुळा, चष्मा लावलेला, क्षयी दिसणारा असा तरुण होता. त्याला पाहतांच मला किळस आला.

त्यानं मला प्रश्न विचारले—माझी परीक्षा घेतली. तो एम्. ए; एल्. एल्. बी; होता. सरकारी अधिकाऱ्याची ऐट मात्र तो अगदीं बरोबर आणीत होता. दिनूभाऊ म्हणाले—त्याला चहा दे म्हणून—पण मी

कांहीं स्वतः त्याला चहा नेऊन दिला नाहीं. 'परीक्षा' होतांच मी निघून गेलें.

आईनं नंतर दिनूभाऊंना काय सांगितलं तें मला कळलं नाहीं. पण ती मला म्हणाली, "तू म्हटलंस तें खरं ग बाई! कसलं मरतमढं आणून उभं केलं दिनूभाऊनीं! नि काय मेला तारीफ करीत होता माझ्याजवळ! विश्वासाचीं माणसं म्हणून ज्यांना म्हणायचं, तींच जर अशीं गळा कापायला उठूं लागलीं तर विश्वास तरी कुणावर ठेवायचा?"

माझा जीव खालीं पडला. मी माझ्या नित्याच्या उद्योगाला लागलें.

—पण त्या रात्रीं एक चमत्कार झाला. घरांत जिकडे तिकडे सामसूम झाल्यावर माझ्या खोलीच्या दारावर कुणीं तरी टिचक्या मारल्या. मी जवळ जवळ झोंपी जायच्या तयारींत होतें. मला वाटलं, पूर्वीसारखाच कुणीतरी थट्टा करायला आला असेल.

मी जाऊन दरवाजा उघडला नि पाहातें तों दारांत बाळासाहेब!

त्यांचा चेहरा अगदीं भेसूर झाला होता, डोळे तारवटल्यासारखे झाले होते—माझ्या तोंडांतून सहज आश्चर्याचा उद्गार निघून गेला.

ते आंत येऊन माझ्या इझीचेअरवर बसले. बसले कसले—पडले म्हटलं तरी चालेल.

मी घाबरून विचारलं, "काय झालं?"

किती तरी वेळ त्यांच्या तोंडातून शब्द बाहेर पडेना. मी अधिकच घाबरून गेलें. पुन्हां विचारलं तेव्हां ते म्हणाले, "मी राजीनामा द्यायला आलों आहें. मला इथं राहायचं नाहीं."

त्यांच्या आवाजांत करारीपणा स्पष्ट दिसत होता. इतक्या करारी शब्दांनीं बोलतांना मी त्यांना कधींही पाहिलं नव्हतं.

"काय झालं?" मी विचारलं, "कुणी तुमचा अपमान केला का?"

"नाहीं," बाळासाहेब अगदीं रुक्षपणानं म्हणाले, "कुणी माझा

अपमान केला नाहीं. कुणी मला त्रास दिला नाहीं. जितक्या सुखांत पूर्वी होतों तितक्याच सुखांत आहें—पण आतां हें सुख पुरे झालं. सुखासाठीं माझा जन्म नाहीं. सद्वर्तनासाठीं माझा जन्म नाहीं. मी नरकांतला किडा आहें. मला नरकांतच लोळलं पाहिजे. नरकांतून स्वर्गांत जाण्याचा मी प्रयत्न करूं लागलों होतों; पण जी शिडी हाताला लागली ती कोसळणार, असं पाहून मी आतां नरकांत उडी घ्यायचा निश्चय केला आहे. इथं यापुढं राहायला मी लायक नाहीं नि म्हणून मी राजीनामा देतों आहें."

"कृपा करा नि मला काय तें स्पष्ट सांगा!" मी काकुळतीला येऊन म्हटलं.

"स्पष्ट काय सांगायचं?" बाळासाहेब चिडून म्हणाले, "आई-बापांनीं माझा तसा नाश केला नि तूं आतां माझ्या सर्वनाशाला उठली आहेस! बाबांनीं मला आईविरुद्ध चिथावलं म्हणून मी आईचा प्रेमळ-पणा पायाखालीं लाथाडला! पुढं बाबांच्या चरकांत सापडलों. त्यांनीं मला चिखलांमातींतून राबवलं म्हणून पळून गेलों—सर्कशीतल्या मवाली पहेलवानांच्या लाथा खात आयुष्य कंठलं—इथं आलों—स्वर्गांत आलों असं मला वाटलं—नि इथं तुम्हीं माझा असा गळा कापतां आहांत!"

"काय केलं आम्हीं असं?" मी घाबरून विचारलं.

"अजून तुला कळत नाहीं?" बाळासाहेब अगदीं त्रासिकपणानं म्हणाले, "कीं नुसतं ढोंग करते आहेस? कीं मला फसवते आहेस? तुझं लग्न ठरलं ना?—"

आतां माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. मी भानावर आलें नि गंभीर-पणानं म्हटलं, "बरं मग? त्यांत तुमचं काय बिघडलं?—"

"तूं इथून निघून गेल्यावर मला इथं वागवणार कोण? कुणाच्या हाताखालीं मी काम करूं? मन भरकटलं तर कुणाकडे पाहून तें

ताळ्यावर आणूं ? कुणासाठीं मी आत्मसंयमन करूं ? सांग ना ? कुणासाठीं नरकाचं साम्राज्य सोडून मी स्वर्गाच्या शिडीला हात घालूं ? ”

त्यांच्या त्या भाषणानं माझ्या हृदयावर मोठा आघात झाला. तरीही मन कठोर करून मी म्हणालें, “ हा काय वेडेपणा ? मी काय तुमच्या जन्माला पुरलें आहें ? आई आहे ना इथं ! केव्हांतरी माझं लग्न होणारच ना ? आजची कांहीं भीति नको. आजचं स्थळ कांहीं पटलं नाहीं आईला; पण उद्यां दुसरा कुणी तरी येऊन घेऊन जाणारच आहे ना मला ? मग आईला आधार द्यायला तुमच्याशिवाय इथं दुसरं कोण आहे ?—”

दोन्ही हात तोंडांवर घट्ट दाबून बाळासाहेब कांहीं वेळ स्वस्थ बसले.

“ जा आतां निजा जाऊन ! ” मी म्हटलं, “ कुणी पाहिलं तुम्हांला यावेळीं इथं, तर भलता प्रसंग यायचा ! ”

तोंडावरचा हात काढून बाळासाहेबांनीं माझ्याकडे पाहिलं. तें त्यांचं पाहाणं काळीज फाडून टाकणारं होतं ! सारा जीव डोळ्यांत आणून अत्यंत काकुळतीनं ते माझ्याकडे पाहात होते. त्या पाहाण्याचा माझ्या मनावर परिणाम झाला—पण पुन्हां मी मन कठोर केलं.

पाहातां पाहातांच त्यांना एकदम हुंदका आला. ते ओक्साबोक्शीं रडूं लागले.

त्यांच्या तोंडून शब्द बाहेर पडले. “ वेणू, वेणू, मला नको ग अंतर देऊंस ! माझ्यासाठीं तरी लग्न करूं नकोस ! कुणाचं कल्याण झालं आहे लग्नानं ! माझी आई आठवते तुला ? तूं तिला चांगली ओळखतेस—तिचा सहवास तुला लाभला आहे—त्या माउलीचे आमच्या बाबांनीं सारा जन्मभर हाल केले—कधीं एक सुखाचा शब्द बोलले नाहींत ! कितीतरी कुटुंबं मी पाहिलीं आहेत—हें असंच चाललं आहे जिकडे तिकडे ! तें संकट तरी तुझ्या कपाळीं यायला नको ! मी उभा राहूं कुणाच्या आधारावर ? तुझ्या आईची काळजी मी घ्यावी, असं तूं म्हणतेस-पण तुला वाटतं का, कीं माझी ती लायकी आहे ? तुझ्या

शब्दावर मी चालतों आहें. तुझं भाषण बोलतों आहें. तुझ्या हातानं काम करतों आहें. तुझ्या जिवानं जगतों आहें. काय सांगूं ? अंतःकरणांत तळमळ होते आहे पण शब्द तोंडावाटे बाहेर पडत नाहींत—''

आवेग त्यांना आवरेनासा झाला नि ते पुन्हां आंक्साबोक्सीं रडूं लागले.

मला नकळत माझ्या कंठांतून हुंदका आला. बाळासाहेब थांबले नि माझ्याकडे पाहूं लागले.

मी मट्‌कन खालीं बसलें—बाळासाहेबांची जी स्थिति झाली होती तीच माझी झाली. मी रडूं लागलें हें पाहून माझं मलाच आश्चर्य वाटलं मी कां रडत होतें तेंच मला कळेना.

बाळासाहेब आवेगानं ओरडले, “वेणू, वेणू, रडूं नकोस ! तुझ्या डोळ्यांतलीं टीपं पाहिलीं, कीं माझ्या काळजाचं पाणी होतं. तूं सांगत असलीस तर जन्मभर मी इथं राहीन, वाटेल ते क्लेश सोशीन, वाटेल तो अपमान सोशीन ! तूं निघून गेलीस तरीदेखील तुझ्या आईची काळजी घेईन, तुझ्या जागीं तिला होईन—पण तूं रडूं नकोस. तुझ्या डोळ्यांतलं एक टीप पाहिलं तरी माझ्या काळजाचं पाणी होतं.—काय होतं कांहीं सांगतां येत नाहीं !—”

ते आंवढ्यावर आंवढे गिळूं लागले. मीही बरीच अस्वस्थ झालें होतें. दोघांनांही बोलायला वाचा नव्हती.

तो प्रसंग मोठा चमत्कारिक होता. सुरवात कुठून झाली नि कोणत्या थरावर गोष्ट कां आली, हें माझं मलाच कळेना.

बाळासाहेब चट्‌कन निघून गेले नि मी जाऊन दाराला कडी घातली. ते पुन्हां येतील म्हणून मला भीति वाटली.

मी दिवा मालवून बिछान्यावर पडलें पण माझा डोळा लागेना. पुन्हां पुन्हां रडण्याचा उमाळा येत होता. तो तसा कां येत होता हेंच मला कळेना.

# प्रकरण १९

## आईला समज दिली

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून मी एकदम जमनाबेनचं घर गाठलं. जातें तों दाराला कुलूप. भय्याजवळ चौकशी केली तेव्हां त्यानं सांगितलं, कीं तार आल्यामुळं सारी मंडळी रात्रीच्या मेलनं काठेवाडांत गेली.

पुन्हां माझी निराशा झाली. निराशा झाली, असं तरी कसं म्हणूं! यापूर्वींच जमनाबेनच्या आईनं माझी निराशा केली होती.

मी घरीं परत येत असतांना विचार करूं लागलें. मी कशासाठीं जमनाबेनकडे गेलें होतें? माझं मलाच उत्तर देतां येईना. मला खात्री पटली. स्वतःचा भार स्वतः सहन केल्याशिवाय मला दुसरा उपाय नव्हता. लहानपणापासून स्वतंत्र वृत्ती माझ्या नशिबीं टिचली गेली होती. आतां या वयांत सुद्धां कुणाचाच आधार नव्हता. आईला विचारलं असतं तर तिला तरी काय सांगतां आलं असतं? आधीं ती जुन्या काळची—त्यांत अगदींच व्यवहारी—अगदीं दुकानदारीबुद्धीची—म्हणजे मी माझ्या आईची हेटाळणी करतें असं नाहीं—तरी तिची वृत्ती अगदींच हिशेबी होती, हें कबूल केल्याखेरीज गत्यंतर नाहीं. सुलोचना पारखी झालेली—नि तिच्या आईची किंमत मला कळून आलेली. माझी मीच विचार करूं लागलें. पहिल्यानं कल्पना भरकटत होत्या. विवेकानं त्या मी हळूहळू गोळा केल्या. त्या साऱ्या कल्पना जेव्हां एकत्र झाल्या तेव्हां त्यांतून मला एक नवी स्फूर्ति मिळाली. त्या स्फूर्तीच्या लहानशा ज्योतीनं माझ्या चिमुकल्या अंतःकरणांत भरपूर प्रकाश पडला.

माझा मलाच आनंद झाला.

मला प्रश्न पडला, त्याग म्हणतात तो हाच का ? त्यागाची व्याख्या तरी काय आहे ?—कांहीं तरी टाकून दिल्यानं त्याग होत असतो का ? स्वीकारण्याच्या कृतींत त्यागाचं तत्व नसतं का ?

या प्रश्नांचा विचार करण्याइतकी तत्वज्ञानाची पुंजी माझ्या पदरीं नव्हती. मी माणमाच्या मनानं विचार करूं लागलें, त्यावेळीं जी कांहीं कल्पना माझ्या मनांत आली होती तीच खरी, असं मला वाटलं. त्या कल्पनेंत त्याग असो वा नसो, उदात्त वृत्ती असो वा नसो, व्यावहारिकता असो वा नसो—त्या वृत्तींत 'माणुसकी' होती—एव्हढं मात्र मला निश्चयानं म्हणतां आलं असतं.

त्या सबंद दिवसांत बाळासाहेबांनीं माझ्या डोळ्याला डोळा दिला नाहीं. रोजचे व्यवहार नित्याप्रमाणें चालले होते. पण त्यांत कांहीं तरी विचुकपणा दिसून येत होता. पूर्वीप्रमाणें मनःप्रवृत्ती मारून बाहेरचा देखावा बेमालूम ठेवण्याची ताकद त्या दिवशीं बाळासाहेबांच्या आंगी राहिली नव्हती. मी शक्य तितकी सावध होतें; पण माझीही बाळासाहेबांसारखीच स्थिति होते आहे कीं काय, याची माझी मला शंका वाटत होती.

तो दिवस मी कसातरी घालवला नि दुसऱ्या दिवशीं मी सावध झालें. बाळासाहेबांच्या विचुकपणांत मात्र फरक झाला नव्हता.

त्या दिवसापासून त्यांच्या वागणुकींत थोडासा भ्रमिष्टपणा आला असावा, असं पाहाणाराला वाटे. दिवाणजी देखील असंच कांहींसं म्हणूं लागले. दिनूभाऊनीं देखील बाळासाहेबांना प्रश्न केला; 'प्रकृती बिघडली आहे का ?' म्हणून विचारलं. पण बाळासाहेबानीं त्यांना नीटसं उत्तर दिलं नाहीं. इतर ओळखीची मंडळीही वेळोवेळीं प्रश्न करूं लागली नि त्या प्रश्नांनीं ते अधिकाधिक भांबावून जाऊं लागले.

एक दोन आठवडे असेच निघून गेले. जमनाबेनच्या आईकडून मला एक दिवस बोलावणं आलं. आजपर्यंत तिनं केव्हांच मला बोलावणं पाठवलं नव्हतं. माझ्या काळजांत धस्स झालं. वाटलं, जमनाबेन आजारी तर नाहीं! मी त्यांच्या घरीं गेलें त्यावेळीं जमनाबेनची आई एकटीच घरीं होती. मी विचारलं त्यावेळीं ती म्हणाली, "सगळंच कांहीं अचानक झालं. आम्हां लोकांचं हें असं आहे. अचानक गोष्टी घडून येणं हें आम्हां व्यापारी लोकांच्या जिण्यांतलं एक महत्वाचं अंग आहे. माझ्या सासऱ्याकडून तार आली. त्यांनीं जमनाबेनचं लग्न ठरवून तिथि-निश्चय ही केला होता. तुला बोलावतांसुद्धां आलं नाहीं. नुसती कंकोत्री कशाला पाठवायची? जमनाबेन म्हणत होती, कीं तार करा म्हणून; पण शेटजींना तें कांहीं आवडलं नाहीं—"

"म्हणजे?" मी आश्चर्यानं उद्गारलें, "जमनाबेनचं लग्न झालं कीं काय?"

ती म्हणाली, "हो. ती आतां सासरीं गेली आहे. आणखी एक महिन्यानं इथं येईल."

मला धक्का बसला. आपलं म्हणायला आतां कुणीच राहिलं नाहीं. जिवाभावाची एक मैत्रीण होती तीही दुरावली. तिची आई झाली तरी वडील माणूस. तिथं एका पातळीवर बोलणं संभवत नव्हतं.

इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून कांहीं वेळानं खिन्न अंतःकरणानं मी घरीं आलें. त्या दिवशीं मी कॉलेजांतही गेलें नाहीं. मन कसं उदासवाणं झालं होतं. जग अगदीं भयाण वाटूं लागलं.

खोलींत समोर टांगलेला बाळासाहेबांच्या आईचा फोटो माझ्या नजरेसमोर होता. मला वाटलं, माझ्याकडे बघून कांहींतरी बोलायला ती उत्सुक झाली आहे. मी वेड्यासारखी कितीतरी वेळ त्या फोटोकडे टक लावून पाहात राहिलें. वेगवेगळे विचार मनांत येत होते. ती माउली आज हयात असती तर मी कोणत्या स्थितींत असतें, याची मी कल्पना

करूं लागलें. आजच्या संपन्नावस्थेंत आम्ही आहोंत, ती संपन्नावस्था आम्हांला आणून देण्यासाठीं या माउलीनं आपला देह ठेवला. ती हयात असती तर अजूनपावेतों माझी आई तिच्या घरीं सैपाकीण म्हणून राहिली असती, त्यांच्या कुटुंबांत मी वाढलें असतं, शिकलेंसवरलें असतें, कदाचित् यापूर्वीच चांगलंसं स्थळ पाहून तिनं माझं लग्नही करून दिलं असतं.

मनांतली तळमळ अनावर झाली. काय करावं हें सुचेना. डोकं अगदीं भणभणूं लागलं.

कोलनवॉटरची घडी डोक्यावर घालून मी ईझीचेअरवर पडलें होतें.

कुणाची तरी चाहूल लागली म्हणून मी डोळे उघडून पाहिले, तों बाळासाहेब शेजारच्या खुर्चीवर येऊन बसले होते.

" प्रकृती बरी नाहीं का?" बाळासाहेबांनीं अगदीं मृदु शब्दांनीं विचारलं.

मला उत्तर सुचेना.

" आतां मी सावध झालों आहें." बाळासाहेब म्हणाले, "पुन्हां तसं कांहीं माझ्या हातून घडणार नाहीं. आता माझं मन माझ्या ताब्यांत पक्केपणानं आलं आहे. कुठंही गेलों, कांहींही झालं, तरी जें वळण एकदां लागलं आहे तें आतां मी सोडणार नाहीं. पण या ढंं इथं राहाणं मात्र मला दुःसह झालं आहे. क्षमा कर. मी जातों याबद्दल तुला काय वाटेल याची मला अटकळ आहे. तरीही माझा आग्रह आहे, कीं मला जायला परवानगी दे. मी निरोप घ्यायला आलों आहें!"

कपाळावरची घडी फेकून देऊन मी ताडकन् उठून बसून म्हणालें, " कुणाच्या हुकमानं तुम्ही जातां?"

माझा प्रश्न ऐकून बाळासाहेब स्तंभित झाले. " जा जाऊन आपल्या कामाला लागा!" मी दरडावून म्हटलं, " कांहीं नाहीं इथून जातां

यायचं ! कशाला उगीच धमकी देतां ? चांगलं डांबून ठेवणार आहे इथं तुम्हाला. काय करतें आहे तें पहा, नि मग जायचा प्रयत्न करा. ”

बाळासाहेब आश्चर्य चकित होऊन म्हणाले, “ तुझा इरादा तरी काय आहे ? कां मला उगीच छळतेस ? जाऊं दे ना मला. मी सामानसुद्धां बांधून तयार ठेवलं आहे. ”

मी ताड्कन उठलें नि धांवतच बाळासाहेबांच्या खोलींत गेलें. त्यांनीं बांधलेलं सामान भराभर सोडून टाकून ट्रंकेंतल्या वस्तू काढून जागच्या जागीं ठेऊन दिल्या.

बाळासाहेब नुसते पाहात उभे होते. मी जायला निघालें असं पाहून ते म्हणाले, “ बरं आहे, जशी तुझी मर्जी. ”

मी कांहींच उत्तर न देतां माझ्या खोलींत आलें.

त्या रात्रीं आईला मी माझ्या खोलींत बोलावून घेतलं. यापूर्वी तिला मी असं कधींच बोलावलं नव्हतं. खोलींत येतांना ती घाबरी-घुबरी झाली होती.

“ काय झालं ? ” ती म्हणाली.

“ कांहीं नाहीं आई, ” मी म्हटलं, “ मला तुला एक गोष्ट विचारायची आहे—” बाळासाहेबांच्या आईच्या फोटोकडे बोट करून मी म्हटलं, “ या बाईनं एक हजार रुपये दिले नसते तर आज माझी स्थिति काय झाली असती, तें मला सांगशील का ? ”

“ काय व्हायची स्थिती ? ” आई एक सुस्कारा टाकून म्हणाली, “ कुणाच्या तरी घरीं धर्माचे तुकडे मोडीत राहिलों असतों किंवा देशो-धडीला तरी लागलों असतों—”

“ माझी काय स्थिति झाली असती ? दारिद्र्यांत असतों तर तूं माझं काय केलं असतंस ? ”

“ कुठलं तरी साधारणसं स्थळ पाहून, कुणातरी भटाभिक्षुकाच्या गळीं तुला बांधलं असतं. ”

" होय ना ? मग आज हें वैभव आहे कुणाचं ? "

" तें तर मी रोज म्हणत असतें ! " आई गहिंवरून म्हणाली, " सारं आहे तें त्या माउलीचं—"

" बाळासाहेब तिचे कोण ? "

" हा काय प्रश्न करतेस ? " आईनं भिवया वर चढवून म्हटलं, " तुला वेड तर नाहीं लागलं ? ती बाळासाहेबांची आई हें तुला माहीत आहे ना ? "

" म्हणजे ते हिचे वारस ? असंच ना ? " मी आईला बजावून विचारलं.

" म्हणतेस तरी काय ? " आई म्हणाली, " तुझ्या बोलण्याचा रोंख नाहीं मला समजला ! "

मी साधेपणानं बोलायला सुरवात केली, " ऐक आई. आतां अगदीं स्पष्ट स्पष्ट बोलतें. हजार रुपये दिले ते या माउलीनं. ते तिनं दिले नसते तर ते तिच्या मुलाचे झाले असते—तिच्या मुलाकडे गेले असते—ते आमच्या कडे आले. मी म्हणतें, ठेव म्हणून आमच्याकडे आले—ती तिची ठेव आम्हीं वापरली, तिच्यावर व्यापार केला, तो फायदेशीर झाला, त्याची शेकडों पट झाली. आतां तिचा हा मुलगा आला आहे. त्याची इष्टेट नको का त्याच्या हवालीं करायला ? "

" मग तूं नि मी कुठं जाणार ? "

" तें मी मागाहून सांगेन. " मी हळूच हंसून म्हटलं, " पण मी म्हटलं एव्हढं सारं तुला पटतं ना ? "

" मला पटतं, " आई म्हणाली, " पण तें आपलं मनाच्या बोलीनं पटतं. व्यवहाराच्या बोलीला कांहीं हें पटायचं नाहीं. कोण असा कर्णाचा अवतार आहे, कीं जो चालून आलेल्या संपत्तीवर लाथ मारील ? माझ्या-जागीं जर दुसरं कुणी असतं तर त्यानं म्हटलं असतं, ' तिनं मला दिलं.

मी त्याच्यावर कमावलं. आतां काय हक्क आहे तिचा त्याच्यावर ?—' मीं तसं म्हणत नाहीं. पदोपदीं मी आठवण ठेवतें आहे, हें सगळं तिचं आहे. नि ही आठवण ठेवतें आहे म्हणूनच मला बरकत येते आहे. "

" खरं ना हें ? तर आतां हें सारं तिचं तिच्या मुलाला देऊन टाक. तो आतां कर्तासवरता झाला आहे. पूर्वी कसाही असेल पण आतां निवळला आहे. तुला नाहीं असं वाटत. ? "

आई थोड्याशा शांतपणानं म्हणाली, "हो—तो निवळला आहे यांत कांहीं शंका नाहीं. पूर्वींच्या वृत्तीचा आतां मागमूस सुद्धां राहिला नाहीं, हें एकादं मेलं आंधळं सुद्धां सांगेल. पण तुझा रोंख काय आहे, तें जरा मला स्पष्ट करून सांगशील ? "

" रोंख एव्हढाच आहे, " मी म्हटलं, " त्यांचं त्यांना देऊन टाकायचं नि आपला मार्ग आपण पाहायचा. "

" मार्ग पाहायचा म्हणजे काय करायचं ? " आईनं विचारलं.

" काय करायचं ? " मी हंसून म्हटलं, " एव्हढंसुद्धां तुला कळत नाहीं आई ? अग ते नाहीं का आपल्याकडे नोकर म्हणून राहिले, तसंच आपणही त्यांच्याकडे नोकर म्हणून राहायचं ! "

" नोकर म्हणून ? " आईनं विचारलं.

" कां राहूं नये ? " मी म्हटलं नि चांगली तोंडभर हंसलें, " काय लाज आहे त्यांत ? एरवीं कुठं तरी नोकरीच केली पाहिजे होती ना आपल्याला ? त्यावेळीं कुठं तरी देऊन टाकणार होतीस ना मला भटाभिक्षुकाला ? मग आतां असं कर—हें वैभव त्यांचं त्यांना देऊन टाक नि त्याबरोबरच आपली मुलगीही त्यांना देऊन टाक. "

आई अगदीं नाजूक हंसली.

मी विचारलं, " कां हंसलीस ? "

" किती झालं तरी तूं खाणावळवालीची मुलगी. शेवटीं आपल्याला हवा तसा नवरा ' शिजवून ' तयार करून घेतलास ! "

आई मोठमोठ्यानं हंसूं लागली. मीही हंसलें. दोघींचंही हंसं एक-मेकांत मिसळलं. आम्ही वेड्यासारख्या हंसत सुटलों.

बाळासाहेब धांवतच खोलींत आले नि म्हणाले, " काय झालं ? "

" तें असं आहे, " आई म्हणाली, " ही आमची वेणू म्हणते आहे—"

" कांहीं सांगायचं नाहीं ! " मी दरडावून सांगितलं, " योग्य वेळीं योग्य गोष्टी झाल्या पाहिजेत. भलत्या वेळीं भलतं बोललं तर त्याचा भलताच परिणाम व्हायचा. त्यांचं डोकं हल्लीं नाहीं ठिकाणावर—तें जरा ठिकाणावर येऊं दे म्हणजे मग सांग. नाहींतर असं कर—यांना घेऊन जा बाजूला—नि काय तें सांग म्हणजे त्यांचं डोकं आपोआप ठिकाणावर येईल. "

हंसत हंसत आई म्हणाली, " इकडे माझ्याबरोबर या बाळासाहेब ! "

चुचकारलेल्या कुलुंगी कुत्र्यासारखे बाळासाहेब आईच्या मागोमाग निघून गेले.

ता क्षण निःसीम आनंदाचा होता. त्या आनंदांत मी निमग्न होऊन गेलें.

## प्रकरण २०
## माझी मालकी कायम राहिली

जमनाबेन माहेरीं आली ती अगदीं वेळींच आली. सुलोचनेनं माझी उपेक्षा केली, जमनाबेननं मला फसवलं—पण मी दोघींनाही विसरलें नाहीं. सुलोचनेला देखील बोलावलं होतं.

वेणू वेलणकरचा अवतार संपला.

बाळासाहेब खाणावळीचे मालक झाले—माझी मालकीही कायम राहिली.

ॐ तत्सत्